भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र. ८२

# दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें

## खण्ड ४

संपादक

डॉ. मो. गं. दीक्षित



शक १८७३ ] Price Rs. 3. [ A. D. 1951

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, स्वीय ग्रंथमाला क्र ८२

# दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें

## खण्ड ४

संपादक
डॉ. मो. गं. दीक्षित

# Sources of the Mediaeval History of the Deccan

## Vol. IV

Ed: Dr. M. G. Dikshit; Ph. D.

शक १८७३ ] Price Rs. 3. [ A. D. 1951

# प्रस्तावना

दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें या मालेंतील प्रस्तुतचा चवथा खण्ड इतिहासाभ्यासकांचे हातीं देतांना मला अत्यंत आनंद वाटत आहे.

ह्या खण्डांत एकंदर अकरा लेख असून त्यांतील ६ ताम्रपट व ४ शिलालेख ह्यांवर आधारलेले आहेत; व उरलेला एक ह्याच प्रकारच्या साधनांवरून संकलीत केलेला एका प्राचीन राजवंशाची माहिती देणारा आहे.

कालखण्डाच्या दृष्टीनें हे लेख इसवी सनाच्या पांचव्या शतकापासून ते सोळाव्या शतकाच्या प्रारंभींच्या काळांत मोडणारे आहेत व त्यांत वाकाटक, विष्णुकुंडी, राष्ट्रकूट, कदंब, शिलाहार, यादव व विजयनगर (तुळुव) ह्या प्रमुख राजवंशाच्या इतिहासावर प्रकाश पडेल अशा अस्सल साधनांचा परामर्श घेतला असल्यामुळें हा ग्रंथ अभ्यासू वाचकांना फार उपयुक्त ठरणार आहे.

यांत प्रसिद्ध केलेल्या सर्व लेखांतील माहिती बहुशः अगदीं नवीन अशी आहे. त्यांतील सात लेखांचीं मूळें तर इतरत्र कोठेंच प्रसिद्ध झालेलीं नाहींत व उरलेल्या साधनांचा परामर्श अन्यत्र घेतला गेला असला तरी मूळ लेखांच्या अभ्यासानें व पूर्वी प्रसिद्ध झाल्यानंतर झालेल्या अधिक संशोधनानें, एतद्विषयक ज्ञानांत इतकी भर पडलेली आहे कीं, त्यांचें अशा तऱ्हेनें पुनर्वाचन प्रसिद्ध होणें अगदीं जरूरीचें होतें हें वाचकांच्या लक्ष्यांत अगदीं सहजगत्या येण्यासारखें आहे. उदाहरणार्थ, महामहोपाध्याय प्रा. मिराशी यांनीं येथें संपादित केलेला घटोत्कच लेण्यांतील लेख आज सुमारें सत्तर वर्षांपासून ज्ञात असला, तरी त्याच्या पुनर्वाचनामुळें, वाकाटकवंशी राजांचें मूलस्थान, घटोत्कच लेण्याचा काळ; व त्या लेण्याचा अजिंठा येथील क्रमांक सतरा या उत्कृष्ट लेण्याशीं जोडला जाणारा संबंध ह्यावर इतका महत्त्वाचा प्रकाश पडत आहे कीं त्यामुळें आपल्या ज्ञानांत बहुमोल भर निश्चितपणें पडेल. मी प्रसिद्ध केलेला कदम्ब जयकेशीचा ताम्रपट देखील हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर परकीय सत्तेचा पाया कसा दृढमूल होत गेला ह्याचें स्पष्ट निदर्शन करणारा आहे. सह्याद्रि मासिकांत पूर्वी प्रसिद्ध झालेला दिवे–आगर येथील आद्य मराठी ताम्रपट देखील ह्याच कारणासाठीं किरकोळ दुरुस्त्या करून येथें पुर्नमुद्रित केला आहे. हें झालें पूर्व–परिचित ताम्रशीलाशासनांविषयीं; परंतु येथें ग्रथित केलेलीं इतर साधनें तर संपूर्णतया नवीन व म्हणून महत्त्वाचीं आहेत.

प्रा. मिराशी व श्री. य. रा. गुप्ते ह्यांच्या खानापूर ताम्रपटावरील लेखामुळें विख्यात विष्णुकुंडी घराण्याचें साम्राज्य कांहीं काळ महाराष्ट्रांतही पसरलें होतें

अशी शंका येण्यास सबळ कारण निर्माण झालें आहे यांत संदेह नाहीं. कदाचित् ह्या बाबतींत विद्वानांत मतभेद होण्याचाही संभव आहे. दुर्दैवानें ह्या ताम्रपटाचा एक पत्रा गहाळ झाला असल्यामुळें त्याविषयीं निर्णायक पुरावा मिळण्याचें एक साधन कायमचें नष्ट झालें आहे.

श्रीयुत ग. ह. खरे ह्यांनीं आपल्या लेखांत कदम्ब राजघराणें व त्यांचे पुरोहित ह्यांचा अन्योन्य संबंध दर्शविणारा एक नवीनच दुवा आपल्यापुढें मांडला आहे; त्यांत उल्लेखिलेला त्रिभुवनमल्ल, हाच पहिल्या जयकेशीचा मुलगा विजयादित्य कीं काय? ह्याचा सूक्ष्म विचार झाला पाहिजे. या ताम्रपटांत उल्लेखिलेलीं स्थळें सुमारें सहाशें वर्षांनंतरही जवळ जवळ त्याच स्वरूपांत विद्यमान असावीं हें विशेष होय.

दिवे–आगर ताम्रपट व आंबे जोगाई येथील लेख मराठी भाषेची उत्क्रांति कसकशी होत गेली ह्याचे निदर्शक म्हणून निःसंशय महत्त्वाचे ठरतील.

क्र. ९–१० ह्या लेखांत येणारी माहिती मामुली असली तरी क्र. ९ हा हरपाल देव ह्या शिलाहारवंशी राजाचा सर्वांत प्राचीन लेख आहे हे विसरून चालणार नाहीं. विजयनगर कृष्णदेवरायाचा ताम्रपट देखील अशींच नवीन माहिती पुरविणारा आहे.

प्रादेशिक विभागांच्या दृष्टीनें येथें प्रसिद्ध झालेले लेख, चार पश्चिम किनाऱ्यावरील, दोन महाराष्ट्राचा गाभा हैद्राबाद संस्थान त्यांतील, व चार खुद्द महाराष्ट्रांतील अशा प्रमाणांत विखुरलेले आहेत, व माझी अशी खात्री आहे कीं याच विभागांत अधिक संशोधन झालें तर तें निश्चित फलदायी झाल्यावांचून रहाणार नाहीं.

ह्या खंडास हातभार लावण्याचें बरेचसें श्रेय महामहोपाध्याय प्रा. वा. वि. मिराशी व श्री. ग. ह. खरे ह्यांना आहे. त्यांनीं केलेल्या मदतीवांचून ह्या मालेंतील तिसरा खण्ड प्रसिद्ध झाल्यावर एक दोन वर्षांचे आंतच ह्या चवथ्या खंडाचें संपादन माझ्या हातून होणें कठीणच होतें. त्याबद्दल त्यांचे आभार मानून, व डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर डॉ. कत्रे ह्यांनीं मला ह्या खण्डाचें संपादन करण्यास मोठ्या उदारतेनें परवानगी दिली ह्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करून ही प्रस्तावना संपवितों.

विजयादशमी
९ ऑक्टोबर १९५१

मो. गं. दीक्षित

# अनुक्रमणिका

# शोध व दुरुस्त्या

पृष्ठ १३ ताम्रपटाचा पाठ ओळ १४ ह्यांत **षट्कर्मेहे(है)तुकं** असें वाचावें

पृष्ठ १६ बह्मनी ताम्रपटांतील वंशावळ **जयबल**, त्याचा पुत्र **वत्सराज**. त्याचा पुत्र **नागबल**, त्याचा पुत्र **भरतबल** ऊर्फ **इंद्र** अशी आहे,

पृष्ठ २४ मोसिणी नदीचा उल्लेख राष्ट्रकूट राजा निरुपम ध्रुव ह्याच्या पिंपरी ताम्रपटांतही आला आहे. **एपिग्राफिया इंडिका**, भाग १०, पृ. ८५.

पृष्ठ ६१ शिरोरेघ. '**विजयादित्याचा**' ह्याचे ऐवजीं '**उदयादित्याचा**' असें वाचावें

शिलालेखाचा पाठ

ओळ १ **संवत्स्स(त्स)रांतर्गौ(र्ग)त.**

ओळ ८ **घाणआ**

ओळ १२ **वसु(सुं)** याचे ऐवजी **वसू(सुं)**

पृष्ठ ६५ शिरोरेघ. **रांजाली** चे ऐवजीं **रांजली** वाचावें

पृष्ठ ७६ ओळ १४ **कृष्णरायपर** ऐवजीं **कृष्णरायपुर** असें वाचावें.

# दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें

## खण्ड ४



## [ १ ] घटोत्कच लेण्यांतील वाकाटककालीन लेख

( महामहोपाध्याय प्रा. वा. वि. मिराशी, एम्. ए., नागपूर )

अजंठ्याच्या पश्चिमेस अकरा मैलांवर गुलवाडा गांवाजवळील टेंकडींत एक लेणें कोरलें आहे त्याला सध्यां 'घटोत्कच' लेणें असें म्हणतात. अजंठ्याच्या वाकाटक-कालीन सोळा नंबरच्या लेण्यासारखेंच हें लेणेंही मोठ्या आकाराचें आहे. त्याची लांबी ७९ फूट व रुंदी ७८ फूट असून त्याला वीस खांब आहेत. समोरच्या व्हरांड्याचे सर्व खांब आतां पडले आहेत. मागील बाजूस मध्यभागीं गर्भगृहांत भगवान् बुद्धाची मूर्ति धर्म-चक्रप्रवर्तनमुद्रेंत कोरली आहे. बुद्धाच्या आसनावर मध्यभागीं धर्मचक्र व दोन बाजूंस एक एक हरिण दाखविलें आहे. सारनाथ येथें भगवान् बुद्धानें मृगदाव नामक कुरणांत आपल्या धर्माचा प्रथम उपदेश केला याचें तें द्योतक आहे.

या लेण्याच्या व्हरांड्यांत मागील भिंतीच्या डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत एक लेख कोरला आहे. या लेण्याची माहिती कॅप्टन रोज नामक इंग्रज गृहस्थानें प्रथम प्रसिद्ध केली व सर्जन ब्रॅडले नामक दुसऱ्या एका इंग्रज गृहस्थानें रॉयल एशियाटिक सोसायटी-च्या मुंबई शाखेच्या नियतकालिकांत ( Journal of the Bombay Branch of the Royal Asiatic Society ) पु. ५ मध्यें त्याचें वर्णन प्रथम प्रकाशित केलें. ब्रॅडले साहेबानें हा लेख पाहिला होता, पण तो त्याला वाचतां आला नव्हता.

त्यानंतर सन १८८१ मध्यें पंडित भगवानलाल इंद्रजी यांनीं पश्चिम हिंदुस्थानच्या लेण्यांतील कोरीव लेख ( Inscriptions from the Cave Temples of Western India ) या पुस्तकांत या लेखाचें वाचन व भाषांतर प्रसिद्ध केलें. या लेखाच्या तेराव्या ओळींत 'देवराज' नांव आलें आहे. त्यावरून पं. भगवानलाल यांनीं हा देवराज अजंठ्याच्या सव्विसाव्या गुहेंत उल्लेखिलेला अश्मक देशाचा तन्नामक मंत्री असावा असें अनुमान करून हें लेणें अजंठ्याच्या १६ व १७ या वाकाटक काळांतील लेण्यांनंतर कोरविलें असावें असें प्रतिपादिलें व डॉ. बर्जेसनें या लेण्याच्या स्थापत्यावरून हा काळ बरोबर असावा असें आपलें मत व्यक्त केलें. नंतर दोन वर्षांनीं डॉ. बुल्हर

यांनीं पुनः या लेखाचें वाचन करून त्याची प्रतिकृति व इंग्रजी अनुवाद यांसह तो पश्चिम हिंदुस्थानांतील पुराणवस्तूंची पाहणी ( Archæological Survey of Western India ) या ग्रंथमालिकेंतील चौथ्या ग्रंथांत प्रसिद्ध केला. या लेखांत उल्लेखिलेला देवराज कोणी ऐतिहासिक व्यक्ति नसून तें इंद्राचें नांव असावें असें आपलें मत बुल्हर साहेबानें व्यक्त केलें. लेखाच्या सातव्या ओळींत भगवानलाल व बुल्हर यांनीं **मलय** असा शब्द वाचला व त्यावरून या लेखांत वर्णिलेलें मंत्रिकुल मलबारांतून आलें असा बुल्हरनें तर्क केला. या ग्रंथांत आरंभीं बर्जेसनें या लेण्याची पुनः संक्षिप्त माहिती दिली आहे. त्यांत तें लेणें वाकाटक राजांचा मन्त्री हस्तिभोज याच्या काळीं म्हणजे उपरिनिर्दिष्ट अजंठ्याच्या गुहांपेक्षां किंचित् अगोदर कोरविलें असावें असें आपलें मत त्यानें नमूद केलें आहे. यानंतर गेल्या सत्तर वर्षांत या लेण्यांतील लेखांचें वाचन व अभ्यास कोणी केलेला माझ्या पहाण्यांत नाहीं. पं. भगवानलाल इंद्रजी व डॉ. बुल्हर यांचीं या लेखाचीं वाचनें व अनुमानें अद्यापि प्रमाणभूत मानलीं जातात. वाकाटककालीन लेखांचा अभ्यास करतांना या लेखाकडे माझें लक्ष गेलें. अजंठ्याचे सोळा व सतरा या लेण्यांतील वाकाटक नृपति हरिषेण याच्या काळचे दोन मोठे लेख मी यापूर्वीं हैद्राबाद आर्किऑलॉजिकल सीरीज या लेखमालिकेंत प्रसिद्ध केले आहेत. याही लेखाची प्रतिकृतीसह संशोधित आवृत्ति प्रसिद्ध करावी असें वाटून मी हैद्राबादच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याचे डायरेक्टर ख्वाजा मुहम्मद अहमद यांना विनंती केली. त्यांनीं या लेखाचे दोन उत्कृष्ट ठसे मजकडे पाठविले, त्यावरून हा लेख वाचला आहे.

पूर्वीं हा लेख बावीस ओळींचा असावा असें दिसतें. पण त्यांपैकीं शेवटच्या चार ओळी आतां पूर्णपणें नष्ट झाल्या आहेत. बाकीच्या अठरा ओळींपैकीं पहिल्या दहा बऱ्याच प्रमाणांत वाचतां येतात. पण त्यानंतरच्या आठ ओळींचा उजव्या बाजूचा पुष्कळ भाग आतां उन्हापावसाच्या माऱ्यानें नाहींसा झाला आहे. या लेखाची मूळची रुंदी चार फूट व उंची २ फूट ५ इं. असावी. अक्षरवटिका अजंठ्याच्या इतर वाकाटककालीन लेखांतल्याप्रमाणें पेटिकाशीर्षक ( box-headed characters ) आहे. भाषा संस्कृत असून सबंध लेख पद्यमय असावा. यांत उपजाति हें एकच वृत्त योजिलें होतें हें डॉ. बुल्हरचें मत बरोबर नाहीं. कारण यांत १२ श्लोकांपर्यंत इन्द्रवज्रा किंवा उपजाति हें वृत्त असून पुढील अवशिष्ट भागांत आर्या, पुष्पिताग्रा व वसन्ततिलका या वृत्तांचा उपयोग केला आहे.

या लेखाचा उद्देश वाकाटकांच्या एका मंत्र्यानें घटोत्कच लेणें कोरविलें हें जाहीर करण्याचा असावा. या मंत्र्याचें नांव आतां नष्ट झालें आहे. पण तो अजंठ्याच्या सोळाव्या लेण्यांत उल्लेखिलेला वाकाटकांचा मंत्री वराहदेवच असावा असें दिसतें. लेखाच्या पहिल्या दोन श्लोकांत बुद्ध, धर्म व संघ यांची स्तुति आहे. तिसऱ्या श्लोकापासून मंत्रिकुळाची स्तुति सुरू होते. तींत म्हटलें आहे कीं दक्षिण दिशेंत वल्लूर नामक ब्राह्मणांचें कुळ प्रसिद्ध आहे.

त्यामध्यें यज्ञपति नामक ब्राह्मण होऊन गेला. तो भृगु, अत्रि, गर्ग व अंगिरस् या प्राचीन ऋषींसारखा विद्वान् व पुण्यशील होता. त्याचा मुलगा देव याच्यामुळें राजासहित सर्व राष्ट्र धर्माचरण करूं लागलें. त्याचा मुलगा सोम यानें ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन्ही जातींतील स्त्रियांशीं विवाह केला. अशा प्रकारचे अनुलोम विवाह प्राचीनकाळीं धर्म्य मानले जात व त्यांचीं उदाहरणें इतर कोरीव लेखांतही आढळतात. ब्राह्मण स्त्रियांपासून सोम ब्राह्मणाला वेदविद्यासंपन्न असे पुत्र झाले. त्यांच्या योगानें त्यांचे निवासस्थान वल्लूर हें अद्यापि दक्षिण दिशेंत प्रसिद्ध आहे असें पुढें या लेखांत म्हटलें आहे.

क्षत्रिय पत्नीपासून सोमाला रवि नामक पुत्र झाला. त्याच्या शरीरावर राजचिन्हें स्पष्ट दिसत असत. त्यानें सर्व भागावर आपला अंमल बसविला असें सातव्या श्लोकांत म्हटलें आहे ( **स क्षत्रियायां कुलशीलवत्यामुत्पादयामास नरेन्द्रचिह्नम् । सुतं सुरूपं रविनामधेयं कृताधिपत्यं विषये समग्रे ॥** ) या श्लोकाच्या शेवटीं बुल्हरनें ‘ मलये समग्रे ’ असें वाचून रवि हा मलयदेशांत राज्य करीत होता व यावरून हें मन्त्रि-घराणें मूळचें मलबारांतलें असावें असें अनुमान केलें आहे. येथील अक्षरें सध्यां किंचित् अस्पष्ट झालीं आहेत. तथापि पहिलें अक्षर ‘ वि ’ व शेवटचें ‘ ये ’ होतें असें दिसतें. मधलें अक्षर आतां स्पष्ट दिसत नाहीं, तथापि तें ‘ ल ’ असावें असें वाटत नाहीं, कारण बुल्हरनें प्रकाशित केलेल्या प्लेटमध्यें येथें दाखविलेल्या लकारासारखा ‘ ल ’ या लेखांत इतरत्र कोठेंही दिसत नाहीं. तेव्हां ‘ मलये ’ हा पाठ असणें असंभवनीय आहे.

रवि ह्या मंत्र्याला प्रवर, प्रवराला श्रीराम, त्याला कीर्ति व कीर्तीला हस्तिभोज असे मुलगे झाले. वाकाटक राजा देवसेन याच्या कारकीर्दीत हस्तिभोज हा आपल्या गुणांनीं उदयास आला. त्याची प्रशंसा अकरा व बारा या दोन श्लोकांत केली होती, पण ते श्लोक आतां खंडित झाले आहेत. तेराव्या श्लोकाचा आरंभ ‘ अथ ’ शब्दानें होतो; त्यावरून त्यांत विषयांतर झालें होतें हें सूचित होतें. या श्लोकाचे आरंभींचे शब्द ‘**अथ देवराजसूनुर्हरि–**’ असे असून पुढील भाग नष्ट झाला आहे. या ठिकाणीं पं. भगवानलाल यांनीं ‘**अथ देवराज**’ व डॉ. बुल्हरनें ‘ **अथ देवराजस्य** ’ इतकेंच वाचलें होतें. हा देवराज अश्मकराजाचा तन्नामक मंत्री असावा असें पं. भगवानलालनीं म्हटलें होतें. पण तें डॉ. बुल्हरला न पटून देवराज म्हणजे कोणी ऐतिहासिक व्यक्ति नसून देवांचा राजा इन्द्र असावा असें त्यानें अनुमान केलें. यापुढील अक्षरें ‘ हरि ’ हीं बुल्हरच्या प्लेटमध्येंही दिसत असल्यामुळें त्याविषयीं संशय नाहीं. ‘ हरि ’ हा ‘ हरिषेण ’ नांवाचा प्रथमावयव दिसतो. तेव्हां ‘ **अथदेवराजसूनुर्हरि–** ’ इत्यादि श्लोकांत वाकाटकनृपति देवसेन याचा मुलगा हरिषेण याचें वर्णन आलें होतें यांत संशय नाहीं. चौदाव्या श्लोकांत हरिषेणाची प्रशंसा केली होती. पंधराव्या श्लोकाचा आरंभ पुनः ‘ अथ ’ शब्दानें झाला आहे. त्यावरून त्या श्लोकांत पुनः मन्त्रिवर्णन सुरू झालें असावें असें दिसतें. त्या श्लोकांत हस्तिभोजाला आपल्या अनेक पुत्रांमध्यें शेंकडो गुणांनीं युक्त असलेला असा एक पुत्र प्रिय होता असें

म्हटलें आहे. त्याचें नांव आतां नष्ट झालें आहे. पण अजंठ्याच्या सोळाव्या लेण्यांतील लेखावरून तो वराहदेवच होता यांत संशय नाहीं. यानंतरच्या श्लोकांत वराहदेवाचें वर्णन व त्यानें कोणत्या हेतूनें हा विहार कोरविला त्याचा निर्देश आला असावा. पण या श्लोकाचीं पहिलीं पांच–सहा अक्षरेंच निश्चितपणें वाचतां येतात. पुढील कांहीं श्लोक तर अजीबात नष्ट झाले आहेत. त्यामुळें यापुढील मजकुराविषयीं कांहींच अनुमान करणें शक्य नाहीं.

प्रस्तुत लेखांत एकंदर नऊ व्यक्तींचें वर्णन आलें आहे. या कुळाचा मूळ पुरुष यज्ञपति हा सोडला तर बाकीचे आठ पुरुष विन्ध्यशक्तीपासून हरिषेणापर्यंत झालेल्या आठ वाकाटक नृपतींचे समकालीन होते असें दिसतें. ते येणेंप्रमाणें:—

| मन्त्रिकुल | | राजवंश (राज्यारंभाचीं वर्षें कंसांत) |
|---|---|---|
| यज्ञपति | | |
| देव | —— | विन्ध्यशक्ति (इ. स. २५०) |
| सोम | —— | पहिला प्रवरसेन (इ.स.२७०) |
| रवि | —— | सर्वसेन (इ. स. ३३०) |
| प्रवर | —— | विन्ध्यसेन (इ. स. ३५५) |
| श्रीराम | —— | दुसरा प्रवरसेन (इ.स.४००) |
| कीर्ति | —— | (नांव अज्ञात) (इ. स. ४१०) |
| हस्तिभोज | —— | देवसेन (इ. स. ४५०) |
| वराहदेव | —— | हरिषेण (इ. स. ४७५) |

ह्या मन्त्रिकुलाला वल्लूर असें तिसऱ्या श्लोकांत म्हटलें आहे. पुढें आठव्या श्लोकांत वल्लूर हें त्यांचें निवासस्थान तेथील ब्राह्मणांच्या योगानें प्रसिद्ध झालें असें वर्णन आलें आहे. त्यावरून या मन्त्रिकुळाचें नांव त्याच्या निवासस्थानावरून पडलें होतें हें उघड आहे. या तऱ्हेचें दुसरें उदाहरण भवभूतीच्या पूर्वजांचें नांव ‘ उदुम्बर ’ हें होय. हेंहि विदर्भांतील उदुम्बर गांवावरून पडलें असावें. या वल्लूर गांवाचा शोध अद्यापि कोणी केला नाहीं, पण तें हैदराबाद संस्थानच्या येलगंडल जिल्ह्यांत हैदराबादच्या ईशान्येस

थोड्याच मैलांवर अद्यापि विद्यमान असलेलें वेलूर असावें. दुसरें एतन्नामक गांव त्या भागांत आढळत नाहीं.

हें मन्त्रिकुल हैद्राबाद संस्थानांतील वेलूर गांवचें असल्यास त्याचा व वाकाटक-वंशाचा संबंध प्रथमपासून कसा आला याची उपपत्ति लावतां येते. कांहीं संशोधकांच्या मतें वाकाटक हे मूळचे उत्तरेंतील असून त्यांनीं पुढें दक्षिणेंत येऊन राज्य स्थापलें असावें. डॉ. काशीप्रसाद जयस्वालानीं तर ओरछा संस्थानांतील बकाट या ग्रामनामा-पासून वाकाटक या वंशनामाची व्युत्पत्ति सुचविली. पण जयस्वालच्या इतर अनेक मतांप्रमाणें यालाही कांहीं आधार दिसत नाहीं. वाकाटक नामाचा पहिला उल्लेख आंध्र देशांतील सुप्रसिद्ध प्राचीन नगर अमरावती येथील एका यात्रेकरूच्या लेखांत प्रथम आढळतो. ही अमरावती वेलूरपासून सुमारें १५० मैलांवर आहे. त्यानंतरचा वाकाटकांचा शिलालेख विदर्भाच्या चांदा जिल्ह्यांत देवटेक येथें सांपडला आहे, तो पहिल्या रुद्रसेनाचा आहे. त्यापुढील वत्सगुल्मशाखेच्या द्वितीय विन्ध्यशक्तीचा (अथवा विन्ध्यसेनाचा) ताम्रपट अकोला जिल्ह्यांत वाशीम येथें मिळाला आहे. नर्मदेच्या उत्तरेस वाकाटकाचे आरंभींचे लेख मुळींच सांपडले नाहींत. शिवाय दक्षिणच्या सातकर्णी, कदम्ब व चालुक्य या राजवंशांच्या लेखांतच आढळणारीं अशीं 'हारीतीपुत्र' व 'मानव्यसगोत्र' हीं बिरुदें व 'धर्ममहाराज' या उपाधि हीं वाकाटकांच्या वाशीमच्या ताम्रपटांत आढळतात; त्यावरूनही त्यांचें मूळचें दाक्षिणात्यत्व स्पष्ट दिसतें. तेव्हां वाकाटक राजवंश व वल्लूरचा मन्त्रिवंश हीं दोन्हीं ब्राह्मण घराणीं एकाच काळीं व दक्षिण हिंदुस्थानच्या एकाच भागांत उदयास आलेलीं दिसतात. आणि म्हणूनच तीं आरंभापासून अखेरपर्यंत राजा व मन्त्री या नात्यानें एकमेकांशीं घनिष्ठ संबंधानें राहिलीं असावीं. अकोला जिल्ह्यांतील तऱ्हाळा गांवीं सांपडलेल्या नाणकसंचयावरून सातवाहन राजे अखेरपर्यंत विदर्भांत राज्य करीत होते असें दिसतें. त्यानंतर लौकरच वाकाटकांचे लेख विदर्भांत मिळतात. तेव्हां वाकाटक मूळचे हैद्राबाद–वऱ्हाड या भागांतील असून सातवाहनानंतर त्यांनीं विदर्भांत राज्यसत्ता काबीज केली यांत संशय नाहीं. या कामीं त्यांना या वल्लूरच्या मंत्रिकुलाचें साहाय्य झालें असावें. या कुळांतील आरंभींच्या देव नामक मंत्र्याच्या वर्णनांत 'सराजकं राष्ट्रमुपेत्य यस्मिन् धर्म्याः क्रियाः पार्थ इव प्रचक्रे' (त्याच्या योगानें राजासहित सर्व राष्ट्र धार्मिक कृत्यें करीत असे) असें म्हटलें आहे. त्याला उपोद्बलक असा पुरावा कोरीव लेखांत आढळतो. हा देव विन्ध्यशक्ति नामक वाकाटक राजवंशाच्या मूळपुरुषाचा व कदाचित् त्याचा मुलगा पहिला प्रवरसेन याचाही समकालीन असावा. पहिल्या प्रवरसेनानें अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क व चार अश्वमेध असे यज्ञ केल्याचा साभिमान उल्लेख वाकाटकांच्या सर्व ताम्रपटांत आढळतो. इतके यज्ञ दुसऱ्या कोणा प्राचीन राजानें केलेले क्वचितच आढळतील. या धार्मिक कृत्यांमध्यें पहिल्या प्रवरसेनाला आपल्या देव नामक मंत्र्याचें प्रोत्साहन व साहाय्य झालें असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुत लेखावरून घटोत्कच लेण्याचा काळही निश्चितपणें ठरवितां येतो. मागें सांगितल्याप्रमाणें या लेण्याच्या काळाविषयीं विद्वानांनीं भिन्न भिन्न मतें प्रदर्शित केलीं आहेत. पण प्रस्तुत लेखावरून हें लेणें वाकाटक नृपति हरिषेण याच्या काळींच कोरविल गेलें होतें हें स्पष्ट दिसतें. हरिषेणाचा मन्त्री वराहदेव हा बौद्ध धर्माचा चाहता होता. त्यानें अजंठा येथें सोळा नंबरचें अत्यंत उत्कृष्ट असें लेणें कोरविलें व त्याला सुंदर चित्रांनीं विभूषित केलें. या चित्रांची प्रशंसा अद्यापिहि होते. याच मन्त्र्यानें हें घटोत्कच लेण कोरवून घेऊन तें बौद्ध भिक्षूंना अर्पण केलें असें दिसतें. तेव्हां या लेण्याचा काळ इ. स. च्या पांचव्या शतकाचा अखेर हा ठरतो.

## लेख[1]

[ वृत्तेः—१–१२ उपजाति; १३ आर्या; १४–१५ पुष्पिताग्रा; १६ वसन्ततिलका, १७ पुष्पिताग्रा, १८ वसन्ततिलका. ]

१ मुनिर्मुनीनाममरोमराणां गुरुर्गुरूणां प्रवरो वराणां (णाम्) [ ।* ]
जयत्यनाभोगविबुद्धबुद्धिर्बुद्धाभिधानो निधिरद्भुतानां(नाम्) [ ॥ १ ॥*]

२ धर्म्मस्ततो धर्म्मविदा प्रणीतस्तथा गणश्चाग्र्यतमो गणानां(नाम्)[ ।* ]
भवन्ति यस्मिन्निहिताः सुपात्रे कारापकारास्तनया ह्युदाराः[2] [ ॥ २ ॥* ]

३ अस्ति प्रकाशो दिशि दक्षिणस्यां वल्लूरनाम्नां द्विजसत्तमानां (नाम्) [ ।* ]
आ ब्रह्मणस्संभूतपुण्यकीर्त्तिर्वङ्शो(वंशो) महीयान्महितो महद्भिः [ ॥ ३ ॥* ]

४ तस्मिन्नभूवाहितलक्षणानां[3] द्विजन्मनां प्राथमकल्पिकानां(नाम्) [ ।* ]
भृग्वात्रिगर्ग्गांगिरसां समानो द्विजर्षभो यज्ञ [पति][4] ~ प्रकाशः [॥४॥*]

---

१ श्री ख्वाजा मुहम्मद अहमद यांनीं पाठविलेल्या छापावरून.

२ या श्लोकांतील शेवटच्या चरणाचा पाठ निःसंदिग्ध नाहीं. पं. भगवानलाल यांनीं 'तनयाप्युदारा' व बुल्हरनें 'तनयाप्युदाराः' असें वाचलें होतें.

३ पं. भगवानलाल व बुल्हर यांनीं '–दाहृतलक्षणानां' असें वाचलें होतें, पण 'हृ' या अक्षरावर वेलांटी दिसते. रघुवंशांतील 'काकुत्स्थ इत्याहितलक्षणोऽभूत्' ही पंक्ति पहा.

४ हें नांव आतां अस्पष्ट झालें आहे. आरंभींचीं दोन अक्षरें 'यज्ञ' मात्र स्पष्ट आहेत. बुल्हरनें 'यज्ञधरः' किंवा 'यज्ञपतिः' असा पाठ सुचविला. शेवटल्या अक्षरावर इकाराची वेलांटी दिसते म्हणून 'यज्ञपतिः' असें नांव वाचणें बरें.

५ तद्‌‌ात्मजो देव इवास्स देव॒कृती गृही[ती][5] नयवान् क्रियावान् [।*]
सराजकं राष्ट्रमुपेत्य यस्मिन्धर्म्या॒क्रिया॒पार्थं[6] इव प्रचक्रे [॥ ५॥*]

६ सोमस्ततस्सोम इवापरोभूत्स ब्राह्मणक्षत्रियवङ्श(वंश)जासु [।*]
श्रुतिस्मृतिभ्यां विहितार्थकारी द्वयीषु भार्यासु मनो दधार [॥ ६॥*]

७ स क्षत्रियायां कुलशीलवत्यामुत्पादयामास नरेन्द्रचिह्नं(ह्नम्) [।*]
सुतं सुरूपं रविनामधेयं कृताधिपत्यं वि[ष]ये[7] समग्रे [॥ ७॥*]

८ द्विजासु चान्यासुसुतानुदारान्स [प्राप] वेदेषु समाप्तकामान् [।*]
वल्लूरनाम्ना दिशि दक्षिणस्यामद्यापि येषाम्वसतिर्द्विजानां(नाम्) [॥८॥*]

९ रवेस्सुतोभूत्प्रवराभिधानः श्रीरामनामाथ बभूव तस्मात् [।*]
तस्यात्मजः कीर्तिरभूत्सुकीर्तिर्ब्बभूव तस्मादथ हस्ति[भोजः] [॥९॥*]

१० वाकाटके राजति देवसेने गुणै॒प्रकाशो[8] भुवि हस्तिभोजः [।*]
अद्यापि यस्याभिजनप्रदान ⏓ – ⏑ – – ⏑ ⏑ – ⏑ – – [॥ १०॥*]

११ धीरेषु धीमत्सु सहोत्थितेषु कृत्य[प्र]मा[णे]षु गुणान्वितेषु [।*]
⏓ – ⏑ – – नृपतेर्य[द्दे] –, ⏓ – ⏑ – – ⏑ ⏑ – ⏑ – – [॥११॥*]

---

५ पं. भगवानलाल यांनीं 'गृहस्थो' व बुल्हरनें 'गृही' असें येथें वाचलें. 'ह' वर वेलांटी दिसते हें बुल्हरनें दाखविलें आहे. त्यानंतरच्या अक्षरावरही वेलांटी दिसते. तेव्हां 'गृहीती' हा पाठ घ्यावा. दशकुमारचरितांतील 'गृहीती षट्स्वङ्गेषु' हा प्रयोग पहा.

६ पं. भगवानलालनीं येथें 'पार्थ' व बुल्हरनें 'नाथ' असें वाचलें. पहिलें अक्षर आतां अस्पष्ट झालें आहे, पण दुसरें स्पष्टपणें 'र्थ' आहे म्हणून 'पार्थ' हाच पाठ मान्य.

७ पं. भगवानलाल व बुल्हर या दोघांनींही येथें 'मलये' असें वाचलें आहे या शब्दाचें पहिलें अक्षर 'म' नसून 'वि' दिसतें. त्यावरची वेलांटी स्पष्ट आहे. दुसरें अक्षर आतां अस्पष्ट झालें आहे. भगवानलालच्या प्लेटमध्यें तें 'ल' सारखें दिसतें, पण त्या 'ल' च्या उजव्या बाजूची रेघ खडी आहे. या लेखांत इतरत्र सर्व ठिकाणीं ती डावीकडे वळविलेली दिसते. तेव्हां हें अक्षर निःसंदिग्ध नाहीं. तिसरें अक्षर मात्र 'ये' स्पष्ट आहे. तेव्हां 'मलये' हा पाठ विवक्षित नसून तो 'विषये' असा असावा.

८ पं. भगवानलाल व बुल्हर यांनीं ठिकाणीं 'गुणैर्षिकोशो' असें वाचलें पण त्यांनीं मानलेली 'षि' ची वेलांटी ही वस्तुतः उपध्मानीयाचें चिन्ह आहे. खरा पाठ 'गुणै ≍ प्रकाशो' असावा.

१२ यस्यासनार्द्धे [ पु ]रुषा ⏑ – –, ⏓ – ~ मात्संसदि – ⏑ – – [ ।* ]
⏓ – ⏑ – – ⏑ ⏑ – ⏑ – –, ⏓ – ⏑ – – ⏑ ⏑ – ⏑ – –
[ ॥ १२॥* ]

१३ अथदेवराजसू[ नु ]र्हरि[१] . . . . . . . . . . . . . . . [ । ]
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . [ ॥ १३॥* ]

१४ शशिकरधवलां नि[री]क्ष्य की[र्तिं] ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑
– ⏑ – – [ ।* ]
⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –, ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑
– ⏑ – – [ ॥ १४ ॥* ]

१५ अथ गुणशतसंभृतात्मभूत॒प्रियतन[ यो ] ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –
[ ।* ]
⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –, ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑
– – [ ॥ १५ ॥* ]

१६ तस्यात्मजेषु बहुषु ⏑ ⏑ – ⏑ – –, – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑
– ⏑ – – [ ।* ]
– – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – –, – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑
– ⏑ – – [ ॥ १६ ॥* ]

१७ फलमखिल ⏑ – – ⏑ – ⏑ – –, ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑
– – [ ।* ]
⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –, ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑
– – [ ॥ १७ ॥* ]

१८ सम्यग्विभावितमथो ⏑ ⏑ – ⏑ – –, – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑
⏑ – ⏑ – – [ ।* ]
– – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – –, – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑
– ⏑ – – [ ॥ १८ ॥* ]

---

१ येथें भगवानलालना 'अथ देवराज' व बुल्हरला 'अथ देवराजस्य' इतकेंच वाचतां आलें, 'देवराज' च्या पुढील अक्षर 'सू' आहे. त्यानंतरचें अक्षर खंडित झालें आहे पण त्याचा खालचा उकार अद्यापि दिसतो. नंतरचीं 'हरि' हीं अक्षरें बुल्हरच्या प्लेटमध्येंही दिसतात व सुदैवानें तीं अद्यापि वाचतां येण्याजोगीं आहेत. 'हरि' हा 'हरिषेण' या नांवाचा अवशिष्ट भाग आहे. हें नांव वाचतां न आल्यामुळें पूर्वीच्या संपादकांना या लेखाचा व घटोत्कच लेण्याचाही काळ बरोबर ठरवितां आला नाहीं.

# [ २ ] महाराज माधववर्मा याचा खानापूर ताम्रपट

[ प्रा० वा. वि. मिराशी व श्री. य. रा. गुप्ते ]

ह्या ताम्रपटाचे दोन पत्रे सन १९२७ मध्यें सातारा जिल्ह्यांतील खानापूर येथें श्री. दादासाहेब माने यांचेकडे मिळाले होते. श्री. य. रा. गुप्ते यांनीं त्यासंबंधीं एक टिप्पण प्रथम भा. इ. सं. मं. च्या त्रैमासिकांत (पु. ८, पृ. १६३ इ.) व नंतर रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नल मध्यें (नूतनमाला, पु. ४, पृ. ८९) प्रसिद्ध केलें आहे. प्रा. मिराशी यांनीं या ताम्रपटावरून महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासावर काय प्रकाश पडतो हें मंडळाचा 'ऐतिहासिक संकीर्ण निबंध' (खंड ४, पृ. १५–२२) यांतील आपल्या लेखांत सविस्तर दाखविलें आहे. तथापि मूळ ताम्रपट अद्यापि कोठेंहि प्रसिद्ध झाला नाहीं. प्राचीन इतिहासाच्या दृष्टीनें तो महत्त्वाचा असल्यानें तो येथें प्रसिद्ध करीत आहों.

या ताम्रपटाचे मूळचे तीन पत्रे असून ते कडींत अडकविले होते असें दिसतें. तथापि पहिला पत्रा व कडी (तीवरील मुद्रेसह) अद्यापि सांपडली नाहीं. दुसऱ्या पत्र्यावर दोन्हीं बाजूंवर लेख होता; पण त्याचा वरचा व खालचा कांहीं भाग मोडून नष्ट झाला आहे. तिसऱ्या पत्र्याच्या एकाच बाजूवर कोरलें आहे. श्री. गुप्ते यांनीं दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूचे फोटोग्राफ व तिसऱ्या पत्र्याचा छाप सन १९२७ मध्यें घेतले होते ते अद्यापि मंडळाच्या संग्रहीं आहेत. पण मूळ पत्रे मात्र आतां गहाळ झाले आहेत. तिसऱ्या पत्र्याच्या छापावरून हे पत्रे १०·९ इंच लांब व ५·६ इंच रुंद होते असें दिसतें.

**अक्षरवटिका**—या लेखाची अक्षरवटिका महाराष्ट्रांत सांपडलेल्या राष्ट्रकूटांच्या प्राचीन ताम्रपटांतल्यासारखी आहे. फरक इतकाच कीं च, थ, म आणि श यासारख्या कांहीं अक्षरांचा खालचा भाग दंतुर केला आहे. आंध्रदेशांतील कांहीं प्राचीन ताम्रपटांत ही पद्धत आढळते. तेव्हां या ताम्रपटाचा कोरक्या आंध्रदेशीय होता असें वाटतें. अक्षरें मोठ्या आकाराचीं पण ओबडधोबड वळणाचीं असून व निष्काळजीपणानें लिहिलीं व कोरलीं आहेत त्यामुळें अनेक ठिकाणीं वाचन संदिग्ध राहतें.

**भाषा**—या लेखाची भाषा संस्कृत आहे शेवटच्या शापाशीर्वादात्मक श्लोकांशिवाय बाकीचा भाग गद्यांत आहे. लेखकाच्या निष्काळजीपणामुळें लेखांत अनेक चुका राहून गेल्या आहेत. 'ऋ' बद्दल 'रि,' 'र' नंतर येणाऱ्या व्यंजनाचें द्वित्व, 'आछेत्ता' या शब्दांत 'च्छ' बद्दल 'छ' इत्यादि लेखनाचे विशेष उल्लेखनीय आहेत.

हा ताम्रपट पुंडरीक, बहुसुवर्ण व इतर अनिर्दिष्ट अक्रतु याग करणारा **महाराज माधववर्मा** यानें दिला होता. त्यानें **'सार्वभौम'** ही पदवी धारण केली होती. तो तेजानें सूर्यासारखा व ऐश्वर्यानें साक्षात् इंद्रासारखा होता, आणि चातुर्वर्ण्य व चातुराश्रम्य यांचा 'धर्मकर्मसेतु' होता असें वर्णन अवशिष्ट भागांत येतें.

माधववर्म्यानें या ताम्रपटानें कांहीं ब्राह्मणांना **कृष्णवेणा** नदीच्या आग्नेयेस असलेलें रेट्टुरक हें गांव वंकतीर्थ, तंबतीर्थ (किंवा स्तंभतीर्थ) आणि कदम्बतीर्थ या घाटांसह आणि बेलवाटिका, कोलिकावाटिका आणि वट्टरिका या तीन वाड्यांसह दिलें होतें असा यांत निर्देश आहे. रेट्टुरक गांवाच्या वायव्येस मच्छद्यीं, देवभियीं आणि सेणबयीं, आग्नेयेस कोलिका आणि पश्चिमेस मलखेटक हीं गांवें होतीं. हें दान वैशाखपूर्णिमेस दिलें होतें. प्रतिग्रह घेणारे ब्राह्मण शालंकायन गोत्री **बोलस्वामी** व भारद्वाजगोत्री **केशवस्वामी** हे होते. बोलस्वामी हा यजनयाजनादि षट्कर्मरत व श्रुतिस्मृतिविहितसनातनधर्मकर्मनिष्ठ होता असें वर्णन आलें आहे. यामध्यें सध्यां सर्वत्र प्रचारांत असलेल्या 'सनातनधर्म' या शब्दाचा प्रयोग उल्लेखनीय आहे. या ताम्रपटाचा लेखक श्रद्धाळु व धर्मशील कायस्थ **श्रीपाल** हा होता.

या ताम्रपटांत कोणत्याही शकाच्या वर्षांचा किंबहुना राज्यसंवत्सराचाही उल्लेख नाहीं. माधववर्म्याची वंशावळ ज्यामध्यें आली असावी तो लेखाचा आरंभींचा भाग आतां अनुपलब्ध आहे. त्यामुळें हा ताम्रपट देणारा माधववर्मा कोणत्या वंशांत व कोणत्या काळीं होऊन गेला हें निश्चितपणें सांगणें कठीण आहे. तथापि अवशिष्ट भागांतील वर्णनावरून कांहीं अनुमानें करतां येतात. हा माधववर्मा अत्यंत धार्मिक असून त्यानें पुंडरीक, बहुसुवर्ण व इतर अकरा यज्ञ केले होते व सार्वभौम पदवी धारण केली होती. प्रस्तुत ताम्रपटाच्या अक्षरवटिकेवरून तो **इ. स. च्या सहाव्या शतकांतील** दिसतो. ज्याला हें वर्णन लागूं पडेल असा या काळांत होऊन गेलेला फक्त एकच माधववर्मा ज्ञात आहे. तो म्हणजे **विष्णुकुंडी** वंशांतील **पहिला माधववर्मन्** होय. हा इ. स. ५१० ते ५६० या काळांत होऊन गेला. याच्या स्वतःच्या व याच्या वंशजांच्या ताम्रपटांत यानें एक हजार अग्निष्टोम, अकरा अश्वमेध आणि बहुसुवर्ण, पुंडरीक, पुरुषमेध, वाजपेय षोडशी, राजसूय, प्राजापत्य, प्राधिराज्य इत्यादि अनेक श्रौत याग केले होते असें वर्णन आहे. प्रस्तुत ताम्रपटांत यांपैकीं पुंडरीक व बहुसुवर्ण या यागांचा निर्देश आहे. शिवाय अनिर्दिष्ट असे जे अकरा याग त्यानें केले होते असें यांत वर्णन केलें आहे ते अश्वमेध असावे. बाकीच्या यागांचा निर्देश सध्यां अनुपलब्ध असलेल्या पहिल्या पत्र्यावरील लेखांत आला असावा असें अनुमान करणें वावगें होणार नाहीं. तेव्हां प्रस्तुत ताम्रपट विष्णुकुंडीवंशीय पहिल्या माधववर्म्यानें दिला होता असें मानण्यास हरकत नाहीं.

हा माधववर्मा अत्यंत बलाढ्य राजा होता. यानें वाकाटकवंशी राजकन्येशीं विवाह केला होता असें याच्या नातवाच्या ताम्रपटांत म्हटलें आहे[1]. ही राजकन्या शेवटचा वाकाटक नृपति हरिषेण याची कन्या किंवा दुसरी कोणी नातेवाईक असावी. हरिषेणानंतर लौकरच वाकाटकवंशाचा अस्त झाला. तेव्हां एकप्रकारें वाकाटक–साम्राज्याचा वारसा

१ **एपिग्राफिया इंडिका**, पु. ४ पृ. १९६.

माधववर्म्याकडे आला होता. त्यानेंही आपल्या कर्तबगारीनें तो सांभाळलेला दिसतो. याच्या इतके अश्वमेध केलेला दुसरा कोणी राजा अद्यापि ज्ञात नाहीं. एका ताम्रपटांत त्याच्या द्वितीय माधववर्मन् नामक नातवाचें वर्णन 'त्रिकूटमलयाधिपति' असें केलें आहे[२]. त्रिकूट हे नाशिकच्या पश्चिमेच्या पर्वतराजीचें नांव होतें हें काहीं वर्षांपूर्वी त्रिंबकजवळ अंजनेरी गांवीं सांपडलेल्या भोगशक्ति राजाच्या ताम्रपटावरून सिद्ध झालें आहे[३]. म्हैसूर संस्थानांतील मलयपर्वत तर सुप्रसिद्ध आहे. त्रिकूटापासून मलयापर्यंतचा हा प्रदेश पहिल्या माधववर्म्यानेंच प्रथम जिंकलेला दिसतो. तेव्हां माधववर्म्याचें राज्य आंध्रदेशापुरतें मर्यादित नसून तें पश्चिमेस महाराष्ट्रापर्यंत पसरलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रस्तुत ताम्रपटावरून हीच गोष्ट सिद्ध होत आहे. उत्तरेस दक्षिणकोसल ( सध्यांचा मध्यप्रदेशांतील छत्तिसगड ) हा देशही त्याच्या साम्राज्यांत मोडत असावा असें दुसऱ्या एका उल्लेखावरून दिसतें.[४]

पहिल्या माधववर्म्याच्या निधनानंतर त्याच्या विस्तृत साम्राज्याची वांटणी झाली. त्याची कारकीर्द दीर्घकाल झाल्यामुळें त्याच्यापूर्वीच त्याचे पुत्र निवर्तले होते त्यामुळें त्याच्यानंतर त्याचे नातू गादीवर आले. महाराष्ट्र व इतर पश्चिमेचा भाग द्वितीय माधववर्मन् नामक एका नातवाकडे व आंध्रदेश दक्षिण कोसल इत्यादि प्रदेश इंद्रवर्मन् नामक दुसऱ्या नातवाकडे गेला. पण त्यानंतर लौकरच विष्णुकुंडीवंशाचें महाराष्ट्रांतून उच्चाटन झालें. कारण प्रस्तुत ताम्रपटाशिवाय विष्णुकुंडीचे लेख महाराष्ट्रांत सांपडले नाहींत. इतकेंच नाहीं तर सहाव्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्रावर राष्ट्रकूट वंशाचें राज्य होतें असें द्वितीय पुलकेशीच्या ऐहोळे येथील शिलालेखावरून दिसतें. त्या लेखांत उल्लेखिलेला भीमरथी नदीच्या उत्तरेकडील प्रदेशाचा अधिपति गोविंद हा राष्ट्रकूटवंशी होता असें कै. डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांनीं केलेलें अनुमान योग्य दिसतें.

प्रस्तुत ताम्रपटांत उल्लेखलेलीं बहुतेक गांवें अद्यापि अस्तित्वांत आहेत. रेट्टुरक हें कऱ्हाड तालुक्यांतील रेठरें बुद्रुक असावें. कृष्णानदीच्या काठीं समोरासमोर रेठरें नांवाचीं दोन गांवें आहेत. त्यांपैकीं रेठरें बुद्रुक हें ताम्रपटांत सांगितलेल्याप्रमाणें कृष्णानदीच्या आग्नेयेस आहे. मच्छदर्या हें सध्यांचें रेठरें बुद्रुकच्या पूर्वेस ४ मैलांवर असलेलें राजमाची असावें. सेणवर्या हें पुणें–मिरज या रेल्वेच्या फांट्यावरचें स्टेशन शेणोली व कोलिका हें रेठरें बुद्रुकच्या आग्नेयेस तीन मैलांवरचें कोला दिसतें. रेट्टुरकच्या वाड्याही अद्यापि ओळखतां येतात. बेलवाटिका हें बेलवडें, कोलिकावाटिका हें कोलवडें, वट्टारिका हें वाठार व मलखेटक हें मलखेट असावें. हीं गांवें रेट्टुरकच्या सभोंवतीं ताम्रपटांत निर्देशिलेल्या

२. एपि. इंडिका, पु. १७, पृ. ३३४.

३. एपि. इंडिका, पु. २५, पृ. २३२.

४. ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड ४, पृ. १८.

त्या त्या दिशास आहेत. तंवतीर्थ हें सध्यांचे कृष्णाकाठचें ताम्बवें व कदम्बतीर्थ हें त्याच्याच समोरच्या तीरावरचें खुबी असावें. वंकतीर्थ मात्र सध्यां नकाशांत कोठें दिसत नाहीं.

## वाचन[1]

दुसरा पत्रा[2], पहिली बाजू

१ · · · · · [ य ] · · · [ स्थ ] · · · [ प ] · · ·

२ वा–[ स ] ये वहुभिर्य्यज्ञण( ज्ञा )वाम्रि( भृ )थे स्नात्वा भूयश्चके(·के) पुण्डरि( री )कबहुसु–

३ वर्णे( र्णं )कादशयाजिनः सार्व्वभौमस्य भास( सा ) भास्करस्य ऐश्व–

४ र्य्येण स्वयमिन्द्रस्य चातुर्व्वर्ण्णं( र्ण्य )चातुराश्रम्यधर्म्मकर्म्मसेतो– र्म्महा–

५ राजाश्रि( श्री )माधववर्म्मणो मतिरुत्पन्ना पात्रभूताभ्यां

६ व्राह्मणप्रवराभ्यां यजनयाजनाध्ययनाध्यापनदानप्रतिग्रहाया( य[3] )

७ श्रुतिस्म्रि( स्मृ )तिविहितसनातनधर्म्मक[ र्म्म ]निरताय द्विवेद[ ग्रि ] ( गृ )हीत[4]सहस्रशालंकायन–

८ [ गो ]त्रछ(च्छ)न्दोगवोलस्वामिन(ने) ता( भा )रद्वाजसगोत्रद्विवेदो(दा) ह[र]ण...

९ · · · केशवस्वामिने च चतुषष्टि[5] · · · · · · · · · · · · · ·

१० · · · त्र चतुसाण[5] भाग कम्रेतः[5] बा · · · · · · · · · · · · · ·

दुसरा पत्रा, दुसरी बाजू

११ · · · · दानप्रभ्र( भृ )तिस [ र्व्वं ] · · · [ न ] [ कर्म ] · · · ·

१२ · · · · भोग योजनाद्दक्षिणतः पूर्वोत्तरेण मछ[द*]र्य्यां द(दे)व–

१३ भिर्य्यां संणवर्य्यां पूर्व्वता(तो) दक्षि[ण*]भागे कोलिकानामग्राम [ :* ] पश्चिमे–

---

१ हें वाचन ताम्रपटाचे फोटोग्राफ व छाप यांवरून केलें आहे.

२ पहिला पत्रा गहाळ झाला आहे.

३ हें व यापुढील ब्राह्मणवर्णनात्मक पदें द्विवचनान्त पाहिजेत.

४ ‘ द्विवेदगृहीत ’ व ‘ द्विवेदाहरण ’ यांनीं या ब्राह्मणांची दोन वेदांतील पारंगतता व्यक्त केली आहे.

५ या शब्दांचा अर्थ ध्यानांत येत नाहीं.

१४ न मलखेटकनामग्रामः हेतेषु[६] मध्ये षट्कर्म्महेतुकयज्णा(ज्ञा)द्यस्व-

१५ र्गापवर्गसिध्यर्थं[७] वाटिकाभिः सहितं निर्दिश्यते [।] कृष्णवेणापूर्व्व-

१६ दक्षिणतः रेट्टुरकं नामग्रामः [ वं ]काति(ती)र्थं तथा तंवतीर्थं कदं-

१७ वतीर्थं बेलवाटिका कोलिकावाटिका वट्टरिका सर्व्वादानविशुद्धमे-
ताभिर्व्वाटि-

१८ कैः( काभिः ) संयुक्तं महावैशाखपौर्णमास्यामह्न( ह्नि ) त्रिभागशेषं विधिवदुदक-

१९ पूर्व्वं रेट्टुरकं दत्तमिति ॥ कल्पसहस्र[सं] ख्यातो भट्टग्रामः उदकी-

२० · · · · · [पि]ण्डद · · · त्तः · · · · · तारं · · · · ·

तिसरा पत्रा

२१ वाप्यते पा( प )राभृ( वृ )धि( द्धिः ) तथा धर्म्मकोशवृधि(द्धिः) विपुलश्च( श्च ) यशः परिधावति । बहु-

२२ भिर्व्वसुधा भुक्ता राजनैः( भिः ) सगरादिभिः (।*) यस्य यस्य यदा भूमिस्त-

२३ स्य तस्य तदा फलं( लम् )[८] [॥ १ ॥*) स्वदत्तां परदत्ता( त्तां ) वा यो हरेत वसुंधरां( राम् ) [।* ] षष्टि-

२४ कल्पसहस्राणि विष्ठायां जायते कि( कृ )मिः [॥ २ ॥* ] स्वदत्तां परदत्तां वा यो

२५ भूमिं परिरप( क्ष )ति [।* ] षष्टिकल्पसहस्राणि स्वर्गलोके प्रमो-

२६ दति[९] [॥ ३ ॥* ] षष्टिं वर्षसहस्र( स्रा )णि स्वर्गे तिष्ट( ष्ठ )ति भु( भू )मिदः [।* ] आ-

२७ छे( च्छे )त्ता चानुमंता[१०] च तान्येव नरके वसेत( त् )[॥ ४ ॥* ] पूर्व्वदत्तां द्विजातिभ्यो यत्ना-

२८ द्रक्ष द्यु( यु )धिष्ठिर [।* ] महिं महिमतां श्रेष्ठ[११] दानाच्छ्रेयोनुपालनं( नम् ) [॥ ५ ॥* ] तस्मा-

---

६ 'एतेषां' वाचावें.

७ 'सिद्ध्यर्थं' वाचावें.

८ श्लोक १–६ यांचें वृत्त अनुष्टुभ्.

९ 'प्रमोदते' वाचावें.

१० 'चानुमन्ता' वाचावें.

११ 'महीं महीमतां श्रेष्ठ' वाचावें.

२९ त्सर्व्वप्रयत्नेन पु(पू)र्व्वदत्तां वसुन्धरां(राम्) [।*] किक्षेपि[12] पालयेद्राजा पातकि(की) स्या-

३० न(न्न) पालयन(न्) [॥ ६ ॥*] कायस्थेन श्रि(श्री)पालेन लिखितःमिति सत्यधर्मसंस्थितेन श्रद्ध(द्धा)न्वितेन[13] [।*]

---

# [ ३ ] प्राचीन भारतांतील पांडववंश

( महामहोपाध्याय वा. वि. मिराशी एम. ए., नागपूर )

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या एका मागील संमेलन प्रसंगीं ऐतिहासिक काळांतील नलवंशाविषयीं माहिती दिली होती. प्रस्तुत लेखांत त्यासारख्याच दुसऱ्या एका प्राचीन राजवंशाविषयीं माहिती अद्ययावत् उपलब्ध झालेल्या साधनांवरून जमवून देण्याचा प्रयत्न केला आहे.

या वंशाला आरंभींच्या लेखांत 'पांडुवंश' किंवा 'पांडववंश' व नंतरच्या लेखांत 'सोमवंश' म्हटलें आहे. या वंशाचा प्रथम सांपडलेला लेख रायपूर जिल्ह्यांतील राजीम येथील ताम्रपट होता. तो सन १८२५ मध्यें कलकत्त्याच्या एशियाटिक रीसर्चेस या संशोधनपर नियतकालिकांत (पु. १५, पृ. ४९९ इ.) एका जैन मुनीनें वाचला होता तसा प्रसिद्ध झाला आहे. त्यानंतर गेल्या सव्वाशें वर्षांत छत्तीसगडच्या रायपूर जिल्ह्यांत या वंशाचे अनेक शिलालेख व ताम्रपट सांपडले आहेत. सुमारें दहा वर्षांपूर्वी डॉ. छाबरा यांना रींवा संस्थानांतीं बह्मनी या गांवीं एक ताम्रपट सांपडला, तोही या वंशाचा असून त्यावरून या राजवंशाविषयीं बरीच नवीन माहिती उपलब्ध झाली आहे. डॉ. छाबरा यांनीं तो ताम्रपट एपिग्राफिया इंडिका मध्यें (पु. २७, पृ. १३२ इ.) अलीकडे प्रसिद्ध केला आहे.

इ. स. च्या पहिल्या शतकांत कुशान वंशाचा उदय होऊन सम्राट् कनिष्काच्या कारकीर्दीत त्याचें साम्राज्य हिंदुस्थानांत उत्तरेंत वायव्य सरहद्द प्रांतापासून पूर्वेस मगध व दक्षिणेस महाराष्ट्रापर्यंत पसरलें. काठेवाडांतील चष्टन व महाराष्ट्र–गुजराथमधील भूमक व नहपान हे क्षत्रप कनिष्कानेंच नेमले होते असें बहुतेक विद्वानांचें मत आहे. इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या द्वितीयार्धांत या साम्राज्याचा मध्यभारतांत हळू हळू संकोच होऊन अस्त झाला. त्या काळीं कौशाम्बी ते बान्धवगड या मध्यहिंदुस्थानच्या प्रदेशांत 'मघ'

---

१२ 'कुच्छ्रेपि' वाचावें.

१३ येथें लेख संपला असें एका आकृतीनें दाखविलें आहे.

नामक राजवंशाचा उदय झाला. यांचे अनेक शिलालेख व नाणीं कौशांबी, फैजपूर, गिंजा, बांधवगड इत्यादि ठिकाणीं सांपडलीं आहेत, त्यांच्या लेखांत एका अनुल्लिखित संवताचीं ५१ ते १५८ पर्यंत वर्षे दिलीं आहेत. बहुतेक विद्वानांचे मतें हा संवत् कनिष्कानें सन ७८ मध्यें स्थापलेला शक संवतच असावा. तें खरें असल्यास हे मघ राजे आरंभीं कुशानांचे मांडलिक होते व म्हणून त्यांनीं सम्राटाच्या संवताचा उपयोग आपल्या लेखांत केला असें म्हणतां येईल. पुढें कुशान साम्राज्याचा अस्त झाल्यावरही तीच कालगणना त्या प्रदेशांत कांहीं काळ चालू राहिली असावी. मघ राजे सुमारें इ. स. १२५ पासून ३३० पर्यंत राज्य करीत होते असें दिसतें. पुराणांतील ऐतिहासिक राजवंशांत 'मेघ' नामक राजवंशाचा उल्लेख आहे तो हाच वंश असावा.

इ. स. च्या चौथ्या शतकांत मगधांत गुप्त राजवंशाचा उदय झाला. त्या वंशांतील दुसरा राजा महाराजाधिराज समुद्रगुप्त ह्यानें आपल्या पराक्रमानें नर्मदेच्या उत्तरेचा बराच मोठा प्रदेश काबीज करून दक्षिणेंतही स्वारी केली आणि कित्येक देश पादाक्रांत केले. त्यानें मघ राजांचा पाडाव करून त्यांच्या राज्यांतील यमुनेच्या कांठचा सुपीक 'वत्स' देश आपल्या साम्राज्यांत सामील केला. उरलेल्या बघेलखंड किंवा रीवा प्रदेशांत त्यानें अनेक छोटीं छोटीं मांडलिक राज्यें अस्तित्वांत आणलीं. नागोद संस्थानांत व जवळपासच्या प्रदेशांत 'परिव्राजक' व 'उच्चकल्प' या दोन मांडलिक राजवंशांचे अनेक ताम्रपट सांपडले आहेत. त्यांमध्यें गुप्त संवताचा उपयोग केला आहे. त्यावरून व इतर कांहीं प्रमाणांवरून हे राजे गुप्तांचे मांडलिक होते असें स्पष्ट दिसतें. त्यांच्या राज्याच्या दक्षिणेचा मेकलदेश पांडववंशी राजांना दिलेला दिसतो. कारण ते आपणांस मेकलदेशचे अधिपति म्हणवत व त्यांचा ताम्रपट रीवा संस्थानांतील बांधवगड जवळ बम्हनी गांवीं सांपडला आहे. त्यांत उल्लेखिलेलीं कांहीं गांवेंही जवळपास सांपडतात.

गुप्तांचें स्वामित्व कबूल करण्यापूर्वी हे राजे मघ राजांचे मांडलिक होते असें दिसतें. बांधवगडास महासेनापति भद्रबल व राजन् वैश्रवण यांचे कोरीव लेख सांपडले आहेत. या सारखींच नांवें मघवंशांतील राजांचीं असल्यानें हे कोरीव लेख मघ राजांचेच असावे असें मानण्यांत येत असे पण तें बरोबर दिसत नाहीं. मघराजे आपणांस 'महाराज' म्हणवीत. त्यांच्या एकाही लेखांत 'महासेनापति' किंवा 'राजन्' या सारख्या हलक्या पदवीचा उपयोग केलेला दिसत नाहीं. तेव्हां महासेनापति भद्रबल हा पांडववंशी असावा. त्याच्या सारखीं 'बल' शब्दांत नांवें बम्हनी ताम्रपटांत आलीं आहेत. राजन् वैश्रवण हा भद्रबलाचा मुलगा. तेव्हां तोही पांडववंशीच. त्याच्यानंतरच्या राजांचीं नांवें मात्र अद्यापि अज्ञात आहेत.

बम्हनी ताम्रपटांत खालील वंशावळ दिली आहे.

**पांडववंश**

**जयबल**

|

(पुत्र)

|

**वत्सराज** (राणी **द्रोणभट्टारिका**)

|

(पुत्र)

|

**नागबल** (राणी **इन्द्रभट्टारिका**)

|

(पुत्र)

|

**भरतबल** ऊर्फ **इंद्र** (राणी, कोसळराजकन्या **लोकप्रकाशा**)

या ताम्रपटांत नागबल व भरतबल दोन राजांची 'महाराज' ही पदवी उल्लेखिली आहे. त्या पूर्वींच्या दोन राजांच्या बाबतींत कोणत्याच पदवीचा उल्लेख नाहीं. याचें कारण निश्चितपणें सांगतां येत नाहीं. नागबल व भरतबल यांनीं आपल्या पराक्रमानें राज्याचा विस्तार करून ही पदवी मिळविली असेल. किंवा त्यापूर्वींच्या राजांचें त्या ताम्रपटांतील सर्व वर्णन पद्यमय असल्यानें त्यांत त्यांची कोणतीच पदवी उल्लेखिली नसेल. असो.

बम्हनी ताम्रपटांत कोणत्याही संवताचा उल्लेख नाहीं. त्यामुळें या राजवंशाचा काल अक्षरवटिकादि साधनांवरून ठरवावा लागतो. त्या ताम्रपटाचे संपादक डॉ. छाबरा यांचे मतें त्या ताम्रपटाचा काल इ. स. चें पांचवें शतक हा असावा. शेवटच्या भरतबल राजाच्या वर्णनांत खालील श्लोक आला आहे—

**योऽसौ संपूर्णशक्तित्रयविनिपतितानेकसामन्तमूर्ध-**
**प्रोद्धृष्टोत्फुल्लपद्मद्युतिचलनयुगाक्रान्तिदिक्चक्रवालः ।**
**सौम्यः सोऽयं च वंशः प्रभव इति जने कीर्त्यते यस्य चोच्चैः**
**स श्रीमान् सार्वभौमप्रथितगुणगणोदीर्णवैरो नरेन्द्रः ॥**

यांतील शब्दयोजना श्लेषयुक्त असून तिच्यायोगें नरेन्द्र (राजा) भरतबलाप्रमाणें त्याचा सम्राट् वाकाटक 'नरेन्द्रसेन' याचेंही वर्णन अभिप्रेत आहे असें डॉ. छाबरा यांनी दाखविलें आहे. हा नरेन्द्रसेन वाकाटकांच्या ज्येष्ठ शाखेतील द्वितीय प्रवरसेनाचा मुलगा, अर्थात् गुप्त सम्राट् द्वितीय चंद्रगुप्त–विक्रमादित्याच्या प्रभावतीगुप्ता नामक मुलीचा नातु. वाकाटकांच्या ताम्रपटांत या नरेंद्रसेनाच्या आज्ञा मालव, मेकल व कोसल या राजांकडून सन्मानिल्या जात असा उल्लेख आला आहे. त्यावरून त्याकाळीं वाकाटकांचें साम्राज्य नर्मदेच्या उत्तरेस माळवा व रीवा संस्थानापर्यंत पसरलें होतें असें दिसतें. मेकल

म्हणजे नर्मदेच्या उगमाजवळचा प्रदेश. नर्मदेला मेकलकन्यका म्हणतात, कारण तिचा उगम मेकल पर्वतांतून झाला आहे. बह्लनी ताम्रपटांतही भरतबल राजा मेकल देशावर राज्य करीत होता असा उल्लेख आहे. तेव्हां त्या ताम्रपटांत त्याचा सम्राट् नरेन्द्रसेन याचें वर्णन आल्यास त्यांत नवल नाहीं. वाकाटक नरेन्द्रसेनाचा पुत्र द्वितीय पृथ्वीषेण याच्या व्याघ्रदेव नामक सामन्ताचे दोन शिलालेख मेकल देशाच्या उत्तरेस पूर्वीच्या जसो संस्थानांत सांपडले आहेत. त्यावरूनही वाकाटकांचें साम्राज्य त्या भागांत पसरलें होतें हें दिसून येईल. हा वाकाटक नरेन्द्रसेन इ. स. ४५० ते ४७० या काळांत राज्य करीत असल्यानें भरतबलाचा काळ सामान्यतः तोच मानण्यास हरकत नाहीं.

भरतबलानंतरचा या वंशाचा इतिहास अनुमानानें जुळवावा लागतो. द्वितीय पृथ्वीषेणाच्या काळानंतर वाकाटकांच्या ज्येष्ठ पातीचें साम्राज्य संपुष्टांत आलें. त्यावेळीं मेकल देशाच्या उत्तरेस राज्य करणाऱ्या महाराज हस्ति नामक राजानें दक्षिणेचा बराचसा भाग आपल्या राज्यांत सामील केला असें दिसतें. कारण त्याच्या इ. स. ५१७ च्या ताम्रपटांत डाहल किंवा जबलपूर जवळचा गांव ब्राह्मणांना दान दिल्याचा उल्लेख आहे. या सुमारास त्यानें पांडववंशीयांच्या मेकल देशावर स्वारी करून तोही काबीज केला असावा. कारण यानंतरचा पांडववंशीयांचा एकही लेख मेकल देशांत अद्यापि मिळाला नाहीं.

यानंतरचे या वंशाचे लेख दक्षिण कोसल देशांत किंवा सध्यांच्या मध्यप्रदेशाच्या छत्तीसगड विभागांत सांपडले आहेत. या लेखाच्या आरंभीं उल्लेखिलेल्या राजीमच्या ताम्रपटांवरून व रायपूर जिल्ह्यांतील इतर कोरीव लेखांवरून खालील वंशावळ ज्ञात झाली आहे.

**पांडववंश** किंवा **सोमवंश**



राजीमचा ताम्रपट तीवरदेव राजाचा असून तो वाकाटकांच्या ताम्रपटांप्रमाणें पेटिकाशीर्षक लिपींत ( box-headed characters ) लिहिला आहे. या ताम्रपटांत कोणत्याही संवताचा उल्लेख नसल्यानें डॉ. फ्लीट, डॉ. कीलहॉर्न वगैरेनीं अक्षरपट्टिकेवरून तीवरदेव आठव्या शतकांत होऊन गेला असावा असें अनुमान केलें होतें. हें अनुमान चूक असून तीवरदेव त्या काळापूर्वी निदान अडीचशें वर्षे इ. स. च्या सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला असावा असें प्रस्तुत लेखकानें सुमारें वीस वर्षांपूर्वी प्रथम सप्रमाण दाखविलें. तो काळ आतां सर्वमान्य झाला आहे. तेव्हां या राजवंशावळींतील पहिला पुरुष तीवरदेवाचा पणजा उदयन हा इ. स. ४८० ते ५०० या काळांत होऊन गेला असें दिसतें. बह्मनी ताम्रपट देणारा भरतबल उर्फ इन्द्र हा वाकाटक नरेन्द्रसेन याचा सामन्त असल्यानें इ. स. ४५०-४७५ या काळांत झाला असावा, असें मागें दाखविलें आहे. तेव्हां उदयन हाच भरतबलाचा मुलगा असावा असें अनुमान करणें बहुधा चूक होणार नाहीं. त्याच्या मुलाचें नांव इंद्रबल हें आजाच्या ( भरतबल उर्फ इन्द्र ) नांवासारखें आहे. यावरूनही वरील अनुमान सयुक्तिक दिसेल.

या उदयनाचा एक शिलालेख पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानांतील कालञ्जरच्या किल्ल्यांत विष्णूच्या देवालयावर लावलेला सांपडला आहे. त्यावरून त्याच्या काळीं पांडववंशाचें मेकलदेशांतून उच्चाटन झालें नसावें असें दिसतें. त्याचा मुलगा इन्द्रबल याला मात्र मेकल देश सोडून कोसलदेशांत ( छत्तीसगडांत ) यावें लागलें. कोसलदेशांत त्यावेळीं शरभपुरचे राजे राज्य करीत होते. या वंशांतील महासुदेवराज नामक राजाच्या अलीकडे सांपडलेल्या ताम्रपटांत एका इन्द्रबल नामक महासामन्त-सर्वाधिकाऱ्याचें नांव आलें आहे. हा इंद्रबल पांडववंशी इन्द्रबलच दिसतो. तेव्हां मेकल देशांतून उच्चाटन झाल्यावर इन्द्रबलानें छत्तीसगडांत येऊन शरभपुरच्या राजाचें मांडलिकत्व स्वीकारलें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्यानंतर लौकरच इन्द्रबलानें आपल्या सम्राटास पदच्युत करून त्याचें राज्य बळकावलें व अशा रीतीनें छत्तीसगडांतील आपल्या राज्याचा पाया घातला.

हा पांडववंश छत्तीसगडांत अनेक पिढ्या राज्य करीत होता हें मागें दिलेल्या वंशावळीवरून दिसून येईल. या राजांनीं छत्तीसगडांत अनेक नगरें वसविलीं, देवालयें बांधलीं व मठ स्थापिले. आरंग, शिरपुर, सरोद, मल्हार वगैरे ठिकाणीं यांचे शिलालेख व ताम्रपट सांपडले आहेत. त्यांवरून त्यांचा हिंदुधर्माप्रमाणें बौद्धधर्मासही उदार आश्रय होता; असें दिसतें. रायपूर जिल्ह्यांतील श्रीपुर ( सध्यांचें शिरपूर ) ही यांची राजधानी होती. तेथें यांचे अनेक कोरीव लेख अद्यापि विद्यमान आहेत.

इ. स. च्या सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत चीनी यात्रेकरू युवन च्वांग हिंदुस्थानांत आला होता. त्यावेळीं त्यानें कोसल देशाला भेट देऊन आपल्या प्रवासवर्णनांत तेथील राजधानी, राजा व लोक यांचें वर्णन केलें आहे. त्यावेळचा पांडववंशी राजा महाशिवगुप्त

ऱ्हा होता. बालपणींच गादीवर आल्यामुळें यानें जवळ जवळ साठ वर्षे राज्य केलें. हा धनुर्विद्येंत लहानपणापासून तरबेज असल्यानें त्याला 'बालार्जुन' असें म्हणत. युवन् च्वांगनें आपल्या काळचा कोसलदेशचा राजा क्षत्रियवंशी असून बौद्ध होता असें म्हटलें आहे. महाशिवगुप्तानें बौद्धधर्म स्वीकारला नव्हता; कारण त्याच्या कारकीर्दीच्या शेवटीं दिलेल्या ताम्रपटांतही त्यानें आपलें परममाहेश्वर असेंच वर्णन केलें आहे. तथापि त्याचा बौद्ध-धर्मासही उदार आश्रय असल्यानें त्या चिनी यात्रेकरूचा तसा समज झाला असावा.

महाशिवगुप्त–बालार्जुनानंतर लौकरच पांडववंशाचा दक्षिण कोसलदेशांत अस्त झाला. त्यानंतर त्या प्रदेशांत नलवंशीयांचें राज्य झालें. नलवंशी राजांचा एक शिलालेख राजीमच्या राजीवलोचनाच्या देवालयांत अद्यापि विद्यमान आहे तो प्रस्तुत लेखकानें एपिग्राफिया इंडिकांत ( पु. २६, पृ. ४९ इ. ) प्रसिद्ध केला आहे. अक्षरवटिकेवरून त्याचा काळ इ. स. चें आठवें शतक हा येतो. त्यांत तीन–चार राजांचा उल्लेख आहे. त्यावरून नलवंशीयांनीं महाशिवगुप्तानंतर लौकरच छत्तीसगडांत आपलें राज्य स्थापलें असें दिसतें.

छत्तीसगडांतून उच्चाटन झाल्यावर पांडववंशाचें काय झालें तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. छत्तीसगडाच्या पूर्वेस पूर्वीच्या पाटणा संस्थानांत व संबळपूर जिल्ह्यांत सांपड-लेल्या अनेक ताम्रपटांत सोमवंशाचा उल्लेख आहे. पांडव हे सोमवंशीच होते व छत्तीस-गडांतील कांहीं लेखांत त्या राजांना सोमवंशी म्हटलें आहे. शिवाय या संबळपुर–पाटणा प्रदेशांतील लेखांत महाशिवगुप्त हें नाम अनेक राजांनीं धारण केलेलें दिसतें. त्यावरून पांडववंशी राजांनीं छत्तीसगडांतून निघून संबळपूर–पाटणा या विभागांत राज्य स्थापिलें असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. कै. देवदत्तपंत भांडारकर यांचे मतें हे दोन राजवंश भिन्न होते. त्याचीं कारणेंही त्यांनीं दिलीं आहेत. या प्रश्नाचा विचार पुढें एखाद्या प्रसंगीं करूं.



# [ ४ ] खाकुरडी ( नाशिक ) येथील राष्ट्रकूट दन्तिदुर्ग याचा ताम्रपट; शके ६७८.

( मो. गं. दीक्षित )

**उपलब्धिः**– हा ताम्रपट मौजे खाकुरडी, ता. मालेगांव, जिल्हा नाशिक येथें जुन्या गांवठाणांत खणत असतांना एका भिल्लास सांपडला. तो नाशिक जिल्ह्याचे डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर डॉ. ग. दा. तगारे ह्यांच्या हातीं आला. नाशिक येथें उत्खननासाठीं गेलों असतांना डॉ. तगारे ह्यांनीं पुढील संस्करणासाठीं तो माझ्या हवालीं केला, ह्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. ह्याचे संपादनाचे कामीं मला डॉ. म. अ. मेहेंदळे ह्यांची अत्यंत उपयुक्त मदत झाली.

**वर्णनः**– ह्या ताम्रपटाचे साडेतेरा इंच × सात इंच ह्या आकाराचे दोन पत्रे आहेत व त्यांच्या कडेला एक एक लहान छिद्र ठेवून त्यांतून कडी अडकवण्याची व्यवस्था केली आहे. ही कडी तीन इंच व्यासाची असून तिच्या जोडावर सन्मुख गरुडाची प्रतिमा उठावांत कोरलेली आहे. माझ्या हातीं ताम्रपट आला त्यावेळीं ही कडी तोडलेली होती. तथापि ती प्रस्तुत ताम्रपटाचीच असल्याचें डॉ. तगारे ह्यांनीं सांगितलें व त्यांच्याच देखत ती तोडण्यांत आली होती. ताम्रपटांत एकंदर ३० ओळी आहेत त्यापैकीं पहिल्यांत १४ व दुसऱ्यावर १६ आहेत.

**अक्षरवटिकाः**– ह्या ताम्रपटाची लिपी दक्षिणी वळणाची नागरी असून ती प्रस्तुत ताम्रपट कोरला त्या काळांतील प्रचलित असलेल्या इतर लेखांशीं जुळती आहे. अक्षरें सुवाच्य कोरलेलीं असलीं तरी तीं वळणदार नाहींत. अक्षराच्या वळणाच्या दृष्टीनें **ख** तसेंच **भू** ह्या अक्षरांचें सर्वत्र येणारें वळण हीं लक्षांत ठेवण्याजोगीं आहेत. **ग**चें स्वरूप दोन प्रकारचें आहे, कित्येक वेळां त्यांतील प्रथमार्ध वांकडी रेघ व वर्तुळ ह्यांनीं युक्त असा दाखविला आहे, तर कित्येक वेळां हाच भाग त्रिकोणाकृतीनें दर्शविला आहे. **क्ष** ह्या अक्षराचें रूप जवळ जवळ **क्क** ह्या अक्षरासारखें दिसतें. स आणि श ह्यांत भेद केला असून, बऱ्याच वेळां व साठीं व उपयोजिला आहे. **दन्ति** हा शब्द एकदां दन्ति असा लिहिला आहे ( ओळ. ८ ) तर पुन्य ( ओळ १७ व २५ ); कर्न ( ओळ १० ), पर्न ( ओळ १७ ) प्रयः ( ओळ १७ ) हे शब्द अनुक्रमें पुण्य, कर्ण, पर्ण आणि प्रिय ह्यासाठीं लिहिलेले आहेत. हे व इतर भाषाविषयक दोष यावरून कोरणाराचें व्याकरणविषयक ज्ञान बेताचेंच दिसतें. ओळ २६ मध्यें भुयो आणि काले ह्या शब्दांपुढें २ चा आंकडा घालून ते शब्द दोनदां उच्चारावयाचे अशी योजना आहे; तोच प्रकार ओळ २७ मध्यें यस्य आणि तस्य ह्यापुढें तसेच आंकडे घालून दिग्दर्शित केला आहे. चांगल्या कोरलेल्या ताम्रपटांत असा प्रकार फारच क्वचित् आढळतो.

लेखाची भाषा संस्कृत व बहुतेक सर्व पद्यमय आहे. संधिनियमांचा भंग, तसेंच यतिभंग वगैरे दोष भरपूर प्रमाणांत येथें आढळतात. पद्यरचनाहि सामान्यच आहे.

**कालोल्लेखः–** ह्या ताम्रपटाचा काल ओळ १५–१६ मध्यें "नागनगान्कमितो शक काले ९७८ वत्सर तारण कार्तिकमासे दर्शतिथौ ग्रहणे सरभानोः" असा दिला आहे. कालदृष्ट्या हा उल्लेख बरोबर नाहीं. तारण संवत्सर दक्षिणी पद्धतीप्रमाणें गतशक ९६६ या वर्षी येतें व त्या वर्षी कार्तिकांत ता. २२ नोव्हेंबर इ. स. १०४४ रोजीं[1] सूर्यग्रहणही होतें; परंतु येथें अक्षरांत व आंकड्यांत ९७८ अशा दोन्ही तऱ्हेनें शकाचा आंकडा दिला असल्यामुळें, ही कालगणना चूक आहे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ९७८ ह्या वर्षी चालू संवत्सर दुर्मुख हें होतें.

**सार व चर्चाः–** प्रस्तुत ताम्रपटांत पुढीलप्रमाणें माहिती आली आहे. प्रथम विष्णूस नमन व त्याची स्तुति केल्यावर, सूर्यवंशामध्यें मानखेटच्या राज्याचें भूषण असलेला कर्कराज नांवाचा राजा होऊन गेल्याचें सांगितलें आहे. तो युद्धविद्येंत फार निष्णात असल्यामुळें त्याला समरैकमल्ल असेंही म्हणत. कर्कराजास, शत्रूंना त्रास देणारा व लोकांचें कल्याण करणारा अमोघवर्ष नांवाचा मुलगा झाला. त्यानें अनेक दानधर्म केले व परनारींना दुःखांतून सोडविलें त्यामुळें तो फार प्रख्यात झाला. त्यानें याचकांना दिलेल्या दानामुळें त्यास देवराज ही उपमा सार्थ शोभत होती. त्याचा मुलगा मोठमोठ्या दुर्गांचा पाडाव करणारा, दंतिदुर्ग ह्या नांवाचा होता. त्यानें युद्धांत धनुर्विद्येंत फार कौशल्य दाखविलें. त्यागामध्यें तो जीमूत, दधीचि, कर्ण, शिबि ह्यांच्याप्रमाणें होता; तर हरिश्चंद्राप्रमाणें सत्त्ववान् असें अनेक प्रकारें त्याचें गुणवर्णन केलेलें आहे. पण तें बहुतेक मामुली स्वरुपाचें आहे. ह्या दंतिदुर्ग राजानें वर सांगितलेल्या दिवशीं भोजपुर ह्या पर्वताच्या पायथ्याशीं वसलेल्या गांवीं ( त्याचा मुक्काम असतांना ) दद्दैव ह्यांचा नातू व कोंमदेव ह्याचा मुलगा गोविंदभट्ट ह्या पाराशरगोत्राच्या तिन्ही वेद जाणणाऱ्या व वेगवेगळ्या शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्या सन्मार्गप्रवृत्त माध्यंदिन ब्राह्मणांस खोग्गवाट ह्या गांवांतील अठरा वृत्ति दान दिल्या. ह्या गांवाच्या सीमा ताम्रपटांत सांगितल्या आहेत त्या अशा. मोहर खेटक व चिंचखेटकाची दरी, पूर्वेस मोसिणी नदी व दक्षिणेस वारुण्यस्थित वंबिलपाटक व उड्डवाटी.

प्रस्तुत ताम्रपट ज्या दंतिदुर्ग राजानें दिला असें म्हटलें आहे तो दंतिदुर्ग इतिहासांत प्रसिद्ध नाहीं. मानखेट( मान्यखेट ) च्या राजांशीं त्याचा दर्शविलेला संबंध, तसेंच सम्राट राष्ट्रकूट घराण्याच्या राजपुरुषांच्या नांवाशीं जुळणारी तो स्वतः त्याचा पिता व आजा यांचीं नांवें, तसेंच ताम्रपटाच्या कडीवरील गरुडाची मुद्रा वगैरे वरून सकृत् दर्शनीं हा राजा राष्ट्रकूट घराण्यांतील असावा असें वाटल्यास नवल नाहीं परंतु

---

[1] पिल्ले, इंडियन एफिमेरीज, भाग ३, पृष्ठ ९१.

वर सांगितलेली कालोल्लेखांतील विसंगति व इतर अंतर्गत पुराव्यावरून हा दंतिदुर्ग राष्ट्रकूट घराण्यांतील नव्हे असें सहज सांगतां येईल.

राष्ट्रकूट घराण्यांत एकंदर दंतिदुर्ग ह्या नांवाचे दोन राजे झाले. त्यांपैकीं विशेष प्रसिद्ध असा पहिला दंतिदुर्ग, राष्ट्रकूट घराण्याचा संस्थापक. ह्याचा काल व प्रस्तुत ताम्रपटाचा काल ह्यांत बरीच तफावत असल्यामुळें, त्यांची सांगड घालतां येणें शक्य नाहीं. राष्ट्रकूट दन्तिदुर्गाचे फक्त दोनच लेख उपलब्ध आहेत. एक वेरुळच्या दशावतार लेण्यांतील व दुसरा वेरुळ ताम्रपट म्हणून संबोधला जाणारा ताम्रपट. ह्यांपैकीं पहिल्यांत कालोल्लेख नाहीं, परंतु वेरुळ ताम्रपट सुमारें ७१५ इसवी सनांतील आहे.[1] साकुरडीं ताम्रपट शके ९७६ मधील म्हटला जाणारा व त्याची लिपि बाराव्या शतकांतील असल्यामुळें ह्यांत उल्लेखिलेला दन्तिदुर्ग व घराण्याचा संस्थापक दंतिदुर्ग हें एक असणें संभवत नाहीं.

दुसऱ्या एका दन्तिदुर्गाचा उल्लेख गुजराथ शाखेपैकीं धारावर्ष निरुपम ध्रुव ह्याच्या शके ७८९ च्या बगुम्रा ताम्रपटांत[2] दूतक राजपुत्र म्हणून येतो. परंतु वर सांगितलेल्या कारणासाठीं ह्याही दंतिदुर्गाचा प्रस्तुत ताम्रपटांतील दन्तिदुर्गाशीं संबंध दाखवितां येत नाहीं. ह्याशिवाय खुद्द ह्या ताम्रपटांतील अंतर्गत पुराव्यावरून देखील हेंच अनुमान काढणें योग्य दिसतें.

( १ ) ह्या ताम्रपटाची सुरुवात इतर राष्ट्रकूट घराण्याच्या लेखांप्रमाणें ' स वोव्या –द्वेधसा धाम ' ह्या प्रास्ताविक श्लोकानें होत नाहीं.

( २ ) ह्यांतील वंशावळ राष्ट्रकूट घराण्यांतील ज्ञात वंशावळीशीं जमत नाहीं.

( ३ ) ' समरैकमल्ल ' ही पदवी राष्ट्रकूट घराण्यांतील कोणत्याही कर्क राजानें धारण केल्याचें ज्ञान नाहीं.

( ४ ) प्रस्तुत ताम्रपटाची मिति गणिताच्या कसोटीस उतरत नाहीं.

( ५ ) प्रस्तुत ताम्रपटाची लिपि बाराव्या शतकांतील म्हणजे चालुक्य तैल ( दुसरा ) ह्याचे हातून राष्ट्रकूट घराण्याचा अंत झाल्यावरची आहे.

---

१ पहा **एपिग्राफिया इंडिका**, पुस्तक २५, पृ. २९; ह्यांत हा ताम्रपट शके ६६३ मधील असें मानलें आहे; तथापि त्यांतील विसंगति महामहोपाध्याय प्रा. वा. वि. मिराशी ह्यांनीं नुकतीच दाखवून तो कलचुरी संवत् ४६३ म्हणजे इ. स. ७१५ मधील असावा असें प्रतिपादन केलें आहे. पहा. **समरी ऑफ पेपर्स**, ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्स, मुंबई १९४९; पृ. १७–१८.

२ **इंडियन ॲन्टिक्वेरी**, भाग १२, पृ. १७९

ह्या सर्व कारणांवरून प्रस्तुत ताम्रपट खोटा आहे असें मानण्याकडेच कल होतो. ताम्रपटांतील, अमोघवर्ष, कर्क, दंतिदुर्ग वगैरे नांवावरून व मानखेटशी त्यांचा जोडलेला संबंध लक्ष्यांत घेतां येवढें मात्र सिद्ध होतें कीं ह्या बलाढ्य घराण्यांची व त्यांतील वीर-पुरुषांची स्मृति बाराव्या शतकांत ज्यावेळीं हा ताम्रपट बनावट केला गेला त्या वेळीं जागृत होती व स्मरतील तशीं नांवें एकापुढें एक जोडून यांतील राजांची वंशावळ बनविली गेली. राष्ट्रकूटांचा सुप्रसिद्ध मयूरखिंडी उर्फ हल्लींचा मारकिंडा हा किल्ला प्रस्तुत ताम्रपट सांपडला त्यापासून अगदीं जवळ सुमारें १५ मैलांवर असल्यामुळेंही ही स्मृति जागृत रहाण्यास विशेष कारण घडलें असेल.

प्रस्तुत ताम्रपटांतील कालोल्लेखाकडे गणितामुळें पडणारी तफावत लक्ष्यांत न घेतां, सार्वभौम राष्ट्रकूट घराणें नष्ट पावल्यावर ह्या घराण्याची एखादी शाखा नाममात्र राहून त्यापैकीं कोणा दंतिदुर्गानें हें दानपत्र कोरविलें किंवा काय ह्या दृष्टीनें विचार केला तरी प्रस्तुत ताम्रपटाच्या वेळीं चालुक्यांचें राज्य सर्व महाराष्ट्रभर पसरलेलें होतें त्यामुळें ही शक्यता फारच कमी वाटते. कालोल्लेख बरोबर नाहीं ही अडचण आहेच.

**स्थळनिश्चयः**–ह्या ताम्रपटांत पुढीलप्रमाणें स्थळनिर्देश आला आहे.

मानखेट ( ओळ ३ ); भो॰य (ज) पुर ( ओळ १७ ), षो(सो)ग्गवाट ( ओळ २२ ), मोहरखेटक ( ओळ २३ ) चिंचाखेटक ( ओ. २३ ). मोसिणिनदी ( ओ. २३ ), वंविल पाटक ( ओ. २३ ) उड्वाटी ( ओ. २३ ).

ह्यापैकीं मानखेट ( = मान्यखेट ) हें हैद्राबाद संस्थानांतील मालखेड हें राष्ट्रकूटांचें राजधानीचें गांव सुप्रसिद्धच आहे. दान दिलेलें सोग्गवाट म्हणजे ताम्रपट सांपडला तें खाकुरडी हें गांव होय. मोहरखेटक, हें खाकुरडीच्या आग्नेयीस चार मैलांवर असलेलें मोर–गव्हाण[1] दिसतें. ह्या गांवाजवळ चिंचाखेटक म्हणजे चिंचखेडें ह्या स्वरूपांत एखादें गांव सांपडावयास पाहिजे परंतु नकाशांत ह्या बाजूस राखीव जंगलाचा भाग असून त्यांत हें खेडें दिसत नाहीं. पूर्वेस मोसिणि नदी–ही हल्लींची मोसम नदी होय. ह्या नदीच्या

---

१ ग्राम–नामांच्या उत्क्रान्त रूपांच्या दृष्टीनें खेटक–ह्याचें गव्हाण हें रूपांतर विचार करण्यासारखें आहे. 'गव्हाण' ह्या अंत्याक्षरांनीं महाराष्ट्रांत पुष्कळ ग्रामनामें बनलेलीं आहेत. उदा. पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांतील साएगव्हाण, पिंपलगव्हाण, गोलेगव्हाण हीं गांवें पहा. '**स्मृतिस्थळ**' ह्या महानुभावीय गद्यग्रंथांत ( संपादक, वा. ना. देशपांडे, यवतमाळ. १९३९, पृ. १५ ) 'गव्हाण' म्हणजे ज्या गांवांत बाजारपेठ नाहीं तें गांव असा अर्थ दिला आहे. ग्रामनामांच्या अभ्यासाच्या दृष्टीनें ही स्मृति फार सूचक आहे. त्यांत "खांडी", "गडी", पाळी( = पल्ली), हाळी(= हल्ली ), 'पुर', "पाटन ( = पाटण ), गव्हान(ण) व "गांव" असें ग्रामनामांचे वेगवेगळे प्रकार कल्पून महानुभावपंथी-यांच्या दृष्टीनें व्युत्पत्ति दिल्या आहेत.

सो-याचा उलेख चालुक्य पुलकेशी दुसरा ह्याच्या लोहणेर ताम्रपटांत मोषिणी-पथक म्हणून आला आहे[२] वारुण्यस्थित वंविल पाटक हे धारद्वार नदीच्या कांठीं वसलेलें वांयगांव असावें. हें साकुरडीच्या नैऋत्येस पांच मैलांवर आहे. उड्वाटी ह्या नांवाचें गांव त्या दिशेस सांपडत नाहीं. हीं नाशिक जिल्ह्यांतील गांवें सर्व्हे ऑफ इंडियानें प्रसिद्ध केलेल्या सर्व्हे शीट क्र. ४६ एल |६ यांत सांपडतात.

भोजपूर हें गांव सिन्नर तालुक्यांतील भोजापूर ( नाशिकच्या दक्षिणेस १२ मैलांवर व सिन्नर पासून पांच मैलांवर ) असण्याची शक्यता आहे.

## पाठ[१]

[ वृत्तें:- १, पृथ्वी; २, १० वसंततिलका; ३, ४ उपजाति; ५, ८, ९, १२, १३, शार्दूलविक्रीडित; ७, १५, १८ ते २१ अनुष्टुभ् ; ११ दोधक; १४, स्रग्धरा; १६, उपेन्द्रवज्रा; १७, शालिनी; ६ चें वृत्त इंद्रवज्रा आणि इंद्रवंशा असें संमिश्र ]

पहिला पत्रा

( १ ) स्वस्ति[२] ओं विष्णवे नमः। जयत्यसुरमर्दनः सुरसमूहहृष्टिप्रदो जगन्मयवपुस्तथा किमपि-

( २ ) नो भवाब्धेस्तरिः । शुभाशुभमतिप्रदः सकलकृत्यसाक्षा[ क्षी ] प्रभुस्तृ(स्त्रि)विष्टपविभूतिदः परमसौख्यहेतुर्हरिः ॥ [ १ ॥* ]

( ३ ) आसीत्प्रशस्तगुणशालिनि सूर्यवंशे राजा व(व)भूव व(व)हुधर्मयुतः प्रशस्तः [ ।* ] यो मानखेटपुरभूषणराज्यभोगा-

( ४ ) त्संलब्ध(ब्ध)तृप्तिरतुलो भुवि कर्कराजः ॥ [ २॥* ] यः सार्द्ध लक्षानि तु ससलोकेनुशासते बा(बा)हुब(ब) लैकवीर्यात् ।

( ५ ) अज्ञातसंख्यो हयवारणानां वीरावतारः समरैकमल्लः ॥ [ ३ ॥* ] अन(नं)तरं तस्य महानृपस्य कल्याणकारी नृपतिर्व( र्बं )-

( ६ ) भूव । अमोघवर्षः सुरराजतुल्यः प्रतापसंत्रासितशत्रुसंघः ॥ [४॥* ] येनानेकगुणान्वितेन सहसा विख्याताकीर्त्या-

( ७ ) स्वयं दत्तानीह तपस्विविप्रनिचये दानानिचान्यानिच । गोभूहेमगजेंद्रवाजिनिवहैव(र्वं)स्त्रैश्च नानावि-

२ खरे, द. म. इ. साधनें, खण्ड १, पृ. ५

१ मूळ ताम्रपटावरून.

२ चिन्हानें दर्शविलेला आहे.

(८) धैर्नित्यं वर्षति याचकेषु सततं श्रीदेवराजोपमः॥ [ ५ ॥*]
तस्माद[३]भूदुग्ग(र्ग)रदत्ति(न्ति)राजो विख्यातकीर्तिर्द्वि-

(९) जदेवभक्तः। कोदंडपार्थो ( र्थो ) रिपुदन्तिकेसरिः प्रताप-
वाञ्चरशिरवज्रदंडः ॥[६॥*] दत्तानि विप्रमुख्येभ्यो येन
दानानि भूत-

(१०) ले। नानाविधानि लोकेस्मिन(न्न)ग्रहाराणि चैवहि॥ [ ७॥*]
यो जीमूतकर्न (र्ण)शिवि(बि)वत्या( त्या )गी गुरुः प्रज्ञया।
लोकज्ञाति-

(११) हितानुगो( ऽ* )त्र व(ब)लिवत्सत्त्वी हरि[४]श्चंद्रवत् ॥ शूरः
शूद्रकवद्युधिष्ठिर इव प्रोक्त्याज्ञया रावणो[५] । विद्यानामधिपः
प्रतापतराणि ( : ) क्ष्मा-

(१२) पालचूडामणिः ॥[ ८॥*] यस्यानन्तागुणगणततिः श्लाघ्या(घ्य)ते
सातिरेकं वं(बं)दिव्रातैरहिपति पुरो गोत्रशत्रोस्तथाग्रे।
क्षो-

(१३) णीशानां प्रतिगृहमहो तुष्टिदा मर्त्यलोके तस्याम्यत्किं
स्तुतिपदमिह प्रोच्यते वार[वा][६]रम् ॥ [ ९ ॥* ] असारः

(१४) संसारस्तृणलवचलं जीवितमिदं कलत्रं मित्रं वा
धनसुखभव(वं)[७] नश्वरमपि । इ-

दुसरा पत्रा

(१५) ति ज्ञात्वा सम्यक्शुभमतिरसौ हृष्टसुमना(:)द्विजायाशुग्रामं वर-
गुणमतेः पर्वणि ददौ ॥ [ १० ॥* ] नाग-

---

३ सहाव्या श्लोकांत व शेवटच्या चरणांत वृत्तदोष फार आहेत; हें वृत्त इंद्रवज्रा व इंद्रवंशा असें मिश्र आहे.

४ रि हें अक्षर कोरतांना गळालें होतें तें रेघेखालीं लिहिलें आहे.

५ रावणाची भक्ति सुप्रसिद्ध आहे, परंतु येथें त्याची तुलना कां केली आहे हें नीटसें लक्ष्यांत येत नाहीं.

६ वा ऐवजीं मूळांत 'व' असें आहे, तथापि मात्रेसाठीं मोकळी जागा आहे त्यावरून ही मात्रा कोरावयाची राहून गेली असें दिसतें.

७ नेहमीं 'धनभवसुखं' असा पाठ येतो.

(१६) नगाम्क(ङ्क)मितौ शककाले ९७८ वत्सर तारण कार्तिकमासे दर्शतिथौ ग्रहणे स्वरभानो[९]–
(१७) भोंजपुरे गिरिपर्न(र्ण)तटे तु ॥[११॥*] आसीद्वालभगोत्र-मंडनमलं स्वाध्यायपुन्य(ण्य)प्रृ(प्रि)यः षट्कर्मैकरतो विचारकु-
(१८) शलो गोत्रेण पाराशरः । सन्मार्गप्रवणः सुधीः कृतमतिः श्रीदद्दैको द्विजः तस्सूनुस्सुधि कोमदेव इ[ति*] यः
(१९) ख्यातो गुणौघैर्भुवि ॥[१२॥*] तज्जो भूरिगुणः शमी नियम-वान्गोविंदभट्टः सुधीः कृत्स्नेज्याविधिवो(बो)धकोह्यविर–
(२०) तं वेदत्रयीपाठकः । षट्कर्मै(र्मै)करतः पुराणवसतिर्माध्यंदिनः शाखया तस्मै ग्राममदान्निजं गुणवते श्रीदंति–
(२१) दुर्गो नृपः ॥[१३॥*] सर्व्वादायैः समेतं करपदरहितं वृक्षवल्ली तृणाश्मतोयाधारैरुपेतं सितधराणि [वृ][१०]तं कृष्टभूमीयुतं च । सो–
(२२) द्रंगदोषदंडोपरिकरसहितं य(या)वदुर्व्वीसशैलाचंद्रार्कौ याव-दंभोनिधिरपिच तथा नामतो षो(खो)ग्गवाटं ॥[१४॥*] अष्टाविंशान्निव(ब)द्धो–
(२३) यं मोहरखेटकस्य तु । चिंचाखेटकंदरीच ग्रामौ । पूर्व्वेण मोसिणिनदी याम्येन वारुण्यस्थितं वंविलपाटकं । उड्वाटी च सि(सी)–
(२४) मायां चतुराघाटविशुद्धकं ॥ दत्तं श्रीदंतिदुर्गेण गोविंदाय यश-स्विने । चतुर्वेदाय शांताय द्विजाय रविपर्व्वणि ॥[१५॥*] श्रीदंति–
(२५) दुर्गः प्रार्थयति । स्ववंशजा वा परवंशजा वा ये पुन्य(ण्य)वंतो मम धर्ममेवं प्रपालयिष्यंति नृपाः समस्तं कृतांजलिः सा–
(२६) दरमास्मि तेभ्यः ॥[१६॥*] सामान्योयं धर्मसेतुर्नराणा(णां) काले२[११] पालनीयो भवद्भिः। सर्वानेतां भागिनो पार्थिवेंद्रां(द्रान्) भूयो२[१२] याचते रा–

९ स्वभानो असें पाहिजे परंतु वृत्तासाठी हा फेरबदल केलेला दिसतो.

१० येथें धृतं असेंही वाचतां येणें शक्य आहे.

११ 'काले काले' असें वाचावें.

१२ 'भूयो भूयो' असें वाचावें.

(२७) मभद्रः ॥ [१७ ॥*] उक्तं च । व(ब)हुभिर्वसुधा भुक्ता राजभिः सगरादिभिः । यस्य२[13] यदा भूमी तस्य२[14] तदा फलं ॥ [१८॥*] षष्टिर्वर्षे[15] सहस्रा-

(२८) णि स्वर्गे तिष्ठति भूमिदः । आच्छेत्ता चानुमंता च तान्येव नरके वसेत् ॥ [१९ ॥*] स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधरां । श्वानयोनिशतं गत्वा-

(२९) चांडालेभ्यो हि जायते ॥ [२० ॥*] श्रीदंतिदुर्गराजेन राजराजेन धीमता । गोविंदनाम विप्राय प्रदत्तं शासनं महत् ॥ [२१॥*] मंगलं महा-

(३०) श्रीः ॥

---

# [५] कदम्ब जयकेशी (पहिला) याचा पणजी ताम्रपट; शक ९८१

(मो. गं. दीक्षित)

**उपलब्धिः**– प्रस्तुत ताम्रपट गोंवें सरहद्दींत पणजी ह्या गांवीं एका शेतकऱ्या-जवळ होता. तो मुंबईच्या इन्डियन हिस्टॉरिकल रिसर्च इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर रेव्हरंड फादर हेरास ह्यांनीं वरील संस्थेसाठीं विकत घेतला असून सध्यां तेथीलच संग्रहालयांत सुरक्षित आहे. कांहीं वर्षांपूर्वी प्रो. मोराएस यांचें **कदम्ब-कुल** हें पुस्तक प्रसिद्ध झालें त्यावेळीं याचें वाचन परिशिष्ट ३, क्रमांक २, पृ. ३९४–४०० ह्यावर दिलें गेलें होतें. परंतु हें प्रसिद्ध करतेवेळीं त्यांतील कांहीं भाग वाचावयाचा राहून गेला, तर कांहीं ठिकाणीं त्या ताम्रपटांतील कित्येक महत्त्वाच्या मुद्यांकडे दुर्लक्ष्य केलें गेलें व दुसऱ्या अनेक कारणांमुळें त्याचें संपादन जितकें शास्त्रशुद्ध व्हावयास पाहिजे तसें झालें नाहीं. ह्यामुळें तो ताम्रपट मी येथें पुन्हां प्रसिद्ध करीत आहें.

**वर्णनः**– ह्या ताम्रपटाचे फार जाड असे तीन पत्रे असून त्यांची लांबीरुंदी सुमारें १० इंच × ६॥ इंच आहे. हे सर्व पत्रे एका वर्तुळाकार कडींत ओवून त्यावर सुमारें ३ इंच व्यासाची गोलाकृति मुद्रा आहे. ह्या मुद्रेवर उठावांत कदम्ब घराण्याचें

---

१३ 'यस्य यस्य' असें वाचावें.

१४ 'तस्य तस्य' असें वाचावें.

१५ 'षष्टिं वर्षसहस्राणि' असें वाचावें.

लांछन–सिंह, तसेंच चंद्रसूर्य कोरलेले असून त्या खालीं नागरी लिपींत "श्रीमलेगे भैरव" अशीं अक्षरें काढलेलीं आहेत[1]. ताम्रपटांचें कडीसह वजन ६०२ तोळे आहे.

ताम्रपटाचा पहिला व शेवटचा पत्रा आंतल्या बाजूनें व मधला पत्रा दोन्हीं बाजूंनीं कोरलेला असून त्यावर एकंदर ५६ ओळी, प्रत्येक बाजूवर १४, याप्रमाणें कोरलेल्या आहेत. ताम्रपटांच्या कडा जाड केल्या असल्यामुळें एकंदर लिखाण फार सुरक्षित राहिलेलें आहे. अक्षरांचें वळण सुंदर असून, त्यांची उंची सुमारें ३।१० इंच एवढी आहे. अक्षरें मेहनत घेऊन खूप खोलवर खोदलेलीं आहेत.

**अक्षरवटिका**:– ताम्रपटाची लिपि नागरी असून त्यांचें वळण प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या खंडांत प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या जयकेशीच्या असोगे ताम्रपटांतील[2] अक्षरांसारखें आहे. ओळ ३, १३, ५२ ह्यांत आढळणारें ई चें स्वरूप, तसेंच ओळ ३४ मधील क्ष, आणि च्छ आणि ओळ ४४ मधील त्थि ह्या अक्षरांचीं वळणें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत. लेखनपद्धतीविषयीं सांगावयाचें तर स हें अक्षर सरसहा श साठीं वापरलें असून, ब साठीं व चा उपयोग केला आहे. ओळ ३९ मध्यें स्थ साठीं स्छ हें अक्षर काढलें आहे. पृष्ठमात्रेचा उपयोग पुष्कळ ठिकाणीं असून क्वचितच ती अक्षराच्या माथ्यावर तिरकी रेघ देऊन काढलेली आढळलेली आढळते, उदाहरणार्थ पेर्पायते (ओळ २४) व वेत्ति (ओळ १४). ओळ २६ मध्यें अवग्रहाचें चिन्ह उपयोजिलें आहे.

**भाषा**:– हा ताम्रपट अथपासून इतिपर्यंत संस्कृत पद्यांत लिहिलेला आहे; ओळ ४८–४९ मध्यें अनुष्टुभ् वृत्तांतील फक्त पहिलाच चरण आलेला असून, दुसऱ्या चरणांत फक्त एकच पाद आहे. ओळ ५२ मधील पद्यहि असेच दोषयुक्त आहे. ताम्रपट शेवटच्या ओळींत (ओळ ५६) मध्यें अर्धवटच सोडला असून त्यापुढील कांहीं अक्षरांची खोडाखोड केल्यासारखी दिसते. ह्यावरून कोरणारानें आपल्यापुढें असलेलें लिखाण नीटपणें ताम्रपटावर उतरलें नाहीं असें दिसतें.

ह्या ताम्रपटांतील प्रशस्तीच्या भागांतील संस्कृत बरें असलें तरी तिसऱ्या पत्र्यावर विशेषतः ग्रामनामें व चतुःसीमा सांगितल्या आहेत त्या ठिकाणीं कोरणाराचा

---

१ **कदम्ब–कुल**, प्रतिमा पत्र ४७ पहा.

२ खरे, **दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें**, खंड २, क्र. ९ पृ. ९–१३

खूपच घोटाळा उडालेला दिसतो. प्रशस्ति संपल्याचें निदर्शक चिन्ह ३२ व्या ओळींत छ्र ह्या अक्षरानें सूचित केले आहे[3].

**कालः**– ह्या ताम्रपटाचा काल शक ९८१ आषाढ वद्य अष्टमी सोमवार असा दिला असून शकाची गणना चंद्र–वसु–ग्रह ह्या शब्दांनीं दर्शविली आहे. ह्या वेळचें संवत्सर विकारी हें होतें. ही कालगणना गणितदृष्ट्या बरोबर असून त्या दिवशीं इंग्रजी तारीख ५ जुलै १०५९ इसवी[4] अशी होती. लेखांत सांगितल्याप्रमाणें त्या दिवशीं सोमवारही होता.

**सार व चर्चा**:– हा ताम्रपट कदम्ब घराण्यांतील गोंवें शाखेपैकीं पहिला जयकेशी ह्यानें वर सांगितलेल्या दिवशीं छड्डम, मधुमद्याचा मुलगा व अलियाचा नातू, ह्यास गोपक द्वीपांतील लघु–मोरंबिका ह्या उजाड गांवांतील कांहीं भाग दान दिल्याचें नमूद करण्यासाठीं कोरलेली आहे.

प्रस्तुत ताम्रपटाची सुरुवात विष्णूच्या वराह अवताराच्या स्तुतीपासून होतें. नंतर कदम्ब घराण्याची उत्पत्ति कशी झाली ह्याविषयींची हकिगत दिली आहे. ह्या घराण्याचा आद्य पुरुष त्रिलोचन कदम्ब हा समुद्रमंथन करून श्रमी झालेल्या शिवाच्या धर्मबिंदूपासून कदम्ब वृक्षाच्या मूळाशीं उत्पन्न झाला असें सांगितलें आहे. ह्या कदम्ब घराण्यांत गुहल्ल (पहिला) हा राजा झाला, व त्याच्या शौर्याचें वर्णन त्यानें एका वाघास आपल्या शक्तीनें मारले वगैरे इतर ताम्रपटांतून आढळतें त्याप्रमाणें दिलें आहे. त्याचा मुलगा पहिला षष्ठ, हा फार दानशूर व मत्त हत्तींना सहज ताब्यावर आणणारा असा होता. त्याचा मुलगा, प्रस्तुत ताम्रपटाचा दाता जयकेशि (पहिला) हा होय. त्यानें पांड्य, चोल वगैरेंचा पराभव केला, व किष्किंधेच्या वनांत राहाणाऱ्या लोकांवर त्यानें सहज जय मिळविला असें त्याचें वर्णन ह्या ताम्रपटांत दिलें आहे; त्याचें समुद्रावर फार वर्चस्व असून तो नौकानयन शास्त्रांत फार प्रवीण होता. परमार घराण्यांतील राजांचाहि त्यानें पराभव केला. ह्यावेळचा परमार राजा भोज ह्याच्यानंतर ह्या घराण्याचें वर्चस्व कोकणांतून जवळ जवळ नष्टच झालें होतें. त्याच्या भयानें वाईट मार्गाचा (का-तंत्र) अवलंब करणारे त्याचे शत्रू, मोठमोठ्या किल्यांचा आश्रय घेऊन

---

३ एकाक्षर–कोशांत 'छ' ह्या अक्षराचे खालीं दिल्याप्रमाणें अर्थ सांगितले आहेत.

निर्मलं 'छं' समाख्यातं तरले 'छः' प्रकीर्त्तितः ।
छेदके 'छः' समाख्यातो विद्वद्भिः शब्दकोविदैः ॥

४ पिळे, इंडियन एफिमेरीज, ३, पृ. १२१.

( दुर्ग–वृत्ति–रत ) त्यांच्याशीं तह करण्याची भाषा ( संध्यक्षराणि ) बोलूं लागत. तसेंच तो दानधर्माचा भोक्ता असल्यामुळें गरीब लोकांच्या पालनपोषणाकडे त्याचें फार लक्ष होतें असें ह्या ताम्रपटांत सांगितलें आहे.

यानंतर ताम्रपटांत दान घेणारा च्छडम ह्याची वंशावळ आली आहे. ताजिक ( अरब ) वंशांतील चेमूल्य येथें वसति करून रहाणारा आळिय नांवाचा एक नौवित्तक होता. त्याचा मुलगा मधुमद ह्यापासून प्रस्तुत ताम्रपटाचा प्रतिग्राही च्छडम हा झाला. त्यानें केशी ( = जयकेशि ) राजाच्या रक्षणार्थ खूप मदत केली; तो अत्यंत मितभाषी असून आपल्या बळाच्या जोरावर खूप संपन्न झाला होता. त्याच्या गुणावर लुब्ध होऊन केशिराजानें त्यास बरेच दिवस उजाड पडलेलें लघु-मोराम्बिका हें गांव देऊं केलें. त्याचा उपयोग कसा करावयाचा हें ताम्रपटांत स्पष्ट सांगितलेलें नसलें तरी तेथें आपलें सैन्य वगैरे ठेवून तेथें परत वसति व्हावी यासाठींच तें दान दिल्याचें दिसतें. हें दान देतांना राजानें पुढीलप्रमाणें अटी घातलेल्या होत्या. प्रतिवर्षी राजास दान घेणाऱ्याकडून ३० निष्क उर्फ भैरव हे दिले गेले पाहिजेत. परंतु सौम्य संवत्सरानंतर ( म्हणजे हा ताम्रपट कोरल्यानंतर दहा वर्षांनीं ) ही रक्कम प्रतिवर्षी ३५ निष्क ह्याप्रमाणें द्यावयाची आहे.

ह्याशिवाय राजास गद्याणक[६] घेण्याचाही अधिकार होता; दान दिलेली वृत्ति

---

५ ताम्रपटलेखकानें हें वर्णन देतांना श्लेष हा अलंकार मोठ्या कुशलतेनें उपयोजिला आहे व संध्यक्षराणि, दुर्गवृत्ति आणि कातंत्रिनो हे शब्द द्व्यर्थी वापरले आहेत. वर सांगितलेल्या अर्थाशिवाय ह्या श्लोकांत दुर्गसिंह ह्या प्रसिद्ध व्याकरणकाराची कातंत्र व्याकरणावरील दुर्गवृत्ति ही टीका व संधि–प्रकरणावरील त्याचें भाष्य हीं येथें निदर्शित केलीं आहेत. दुर्गसिंहाचा काल इसवी सनाचें आठवें शतक असा मानण्यांत येत असल्यामुळें ( पहा, बेलवलकर, **सिस्टिम्स् ऑफ संस्कृत ग्रामर**, पृ. ८८ ) प्रस्तुत ताम्रपटांत त्याच्याविषयीं उल्लेख येणें अस्वाभाविक नाहीं. इ. स. १०८८ मध्यें गुजराथेंत ह्या वृत्तीवर वर्धमान ह्यानें टीका लिहिलेली आढळते. त्यावरून गुजराथ तसेंच गोवें विभागांत जयकेशीच्या कालीं हें कातंत्र व्याकरण अभ्यासिलें जात होतें असें दिसतें.

शर्वशर्म्याचें कातंत्र व्याकरण, दुर्गवृत्ति ही दुर्गसिंहाची त्यावरील टीका ही देवगिरीचा यादव राजा रामचंद्र ह्याच्या शके १२३२ मधील पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांत देखील ( श्लो. १५ ) अशाच तऱ्हेनें अलंकारानें ध्वनित केली आहे. **एपिग्राफिया इंडिका**. पु. २५, पृ. १९९–२२५.

६ ह्याशिवाय गद्याणकांपूर्वी " पागे " असा शब्द आला आहे. त्याचा अर्थबोध होत नाहीं. हा शब्द श्री. ग. ह. खरे ह्यांनीं पुढें प्रसिद्ध केलेल्या कदम्ब ताम्रपटांतून ह्याच संदर्भांत आला आहे.

काणिक आणि पंचक[८] (ह्या करापासून) तसेंच इतर दशबंधापासून[९] मुक्त केली होती; तसेंच तेथून वेठ घेण्यास (सक्तीची मोलमजुरी) ही मनाई होती.

दान दिलेल्या जमिनीचेंही पुष्कळ वर्णन या ताम्रपटांत दिलें आहे. कारा, केतक, आंबे, वड त्याचप्रमाणें वाऱ्यानें हलणारीं नारळीचीं झाडें तिच्या पूर्वसीमेवर होतीं. दक्षिणेस दगडांची मोठी थोरली रांग व त्याच्या कांठांशीं एक ओढा होता. नैऋत्येस एक खाजण असून त्याच्या पलीकडे मोठें चोरांचें वन, पश्चिमेस कंदनवन नांवाचें शेत व त्याच्या पलीकडे पावर नांवाचें खाजण, त्याशेजारीं नदी व आग्नेयीस जुन्या राजानें खणविलेला खंदक आणि कल्प नांवाच्या खाजणाचा नुकतेंच आलेलें पीक सांठविलें आहे असा भाग, तसेंच प्रतिबल नांवाचें खाजण, याप्रमाणें सर्व लोकांना माहीत झालेल्या सीमा येथें दिल्या आहेत. ह्याशिवाय ज्या वेळीं हा (उजाड) गांव धनधान्यादींनीं समृद्ध होईल त्यावेळीं कोणीही स्थानिक अधिकाऱ्यांनीं तेथील शेतास कुंपण वगैरे घालूं नये; तेथील सर्व खंदक, मिठाचे डोंगर, तळीं वगैरें राजानें वर उल्लेखिलेल्या च्छडमास दिली आहेत अशी राजाज्ञा होती व ती त्यानें वंशपरंपरा, सर्व करविरहित उपभोगावयाची आहे. हा ताम्रपट विश्वरूप नांवाच्या इसमानें कोरला असें शेवटीं सांगितलें आहे.

स्थूलमानानें पाहिले तर एका अरब माणसाला कदम्ब जयकेशीनें दिलेलें दानपत्र येवढाच ह्या ताम्रपटाचा विषय असला, तरी हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर परकीय लोकांचें आक्रमण[१०] कसें होत गेलें हें समजून घेण्यास हा ताम्रपट अत्यंत महत्त्वाचा आहे.

ह्या ताम्रपटाचा प्रतिग्राही ताजिक म्हणजे अरबस्तानांत रहाणारा होता हें वर सांगितलेंच आहे. ह्याशिवाय त्याला "नो-वित्तक" असेंही म्हटलेलें आढळतें. नौवित्तक ह्या शब्दाचा अर्थ दोन प्रकारांनीं करतां येणें शक्य आहे. एक सर्वसाधारणपणें सहज

---

७ काणिक हा कानडी शब्द असून त्याचा अर्थ नजर किंवा भेटीस गेले वेळीं द्यावयाची वस्तु असा आहे. ह्या शब्दाचा अर्थ सांगितल्याबद्दल मी श्री. ग. ह. खरे यांचा आभारी आहे.

८ पंचक हा देखील एक प्रकारचा कर असावा.

९ दशबंधासाठीं **इंडियन ॲन्टिक्वेरी** पु. ३० पृ. १०७ व २६७ पहा. 'दशबंध' म्हणजे स्थावर मिळकतीवरील मिळालेल्या रकमेचा दहावा हिस्सा असा अर्थ **मानव धर्मशास्त्र**, ८–१०७ मध्यें दिला आहे.

१० ह्या विषयावरील डॉ. दे. रा. भाण्डारकर ह्यांचा **ॲनल्स् ऑफ दी भाण्डारकर इन्स्टिट्यूट** भाग १०, पृ. २५–४४ वरील लेख पहा.

११ "नवायत" ह्याविषयीं **हॉब्सन जॉबसन**, पृ. ६२० वर बरीच ऐतिहासिक माहिती आढळते.

लक्ष्यांत येईल असा म्हणजे "नावा हीच ज्याची संपत्ति आहे" असा; किंवा दुसऱ्या प्रकारें तो "नवायत" ह्याचें संस्कृत रूपांतर असाहि होऊं शकेल. 'नवायत' ही हिंदुस्थानांत येऊन राहिलेल्या मुसलमानांची मिश्र संतति होय व ह्या नांवानें ओळखले जाणारे अरब सिराफ, ओमान वगैरे बंदरावरून हिंदुस्थानांत मलबार, दक्षिण कानरा व विशेषतः मलबार आणि कोंकण ह्या विभागांत सुमारें ९४३–९५५ इसवीच्या सुमारास स्थायिक झाले असल्याचे प्रसिद्ध अरब भूवर्णनकार अल् मसूदी ह्यानें लिहून ठेवलें आहे. अरब लोकांचा हिंदुस्थानांत पश्चिम किनाऱ्यावरील आक्रमणाचा अगदीं पहिला उल्लेख गुजराथच्या चालुक्य राजा अवनिजनाश्रय पुलकेशी ह्याच्या क. सं. ४९० (= ७३८ इसवी) मधील नवसारी ताम्रपटांत[13] आढळतो व त्यांत नवसारीजवळच्या प्रदेशावर चाल करून येणाऱ्या ताजिकांना थोपवून धरण्याकरितां ह्या राजास आपलें सैन्य पाठवावें लागलें अशी माहिती दिली आहे.

ह्या लेखांत दान घेणाऱ्याच्या आजाचें व बापाचें नांव अनुक्रमें अलिय व मधुमद अशीं दिलीं आहेत. हीं नांवें अल्ला व महमद् या मुसलमानी नांवाचें संस्कृत रूपान्तर आहे हें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येईल. च्छडम किंवा छडम हें नांव मात्र मूळच्या अरबी जसेंच्या तसेंच कायम ठेवलें असून त्याचा अर्थ "परमेश्वराचें स्मरण करणारा" किंवा ज्याला प्रतिहारी हा संस्कृत प्रतिशब्द यथार्थतेनें लावतां येईल असा "द्वाररक्षक" हा आहे. प्रस्तुत च्छडम किंवा त्याच्या घराण्यांतील कोणीतरी कदम्ब गुह्लल (पहिला) राजास समुद्रांतून बुडतांना वांचविलें अशी हकिगत, प्रस्तुत ताम्रपटापूर्वीं सुमारें सहा वर्षें अगोदर कोरल्या गेलेल्या शक ९७५ मधील एका ताम्रपटांत आली आहे. ह्या ताम्रपटाचें मूळ सध्यां उपलब्ध नाहीं, परंतु त्यांतील श्लोकांचे उतारे व त्यांचें पोर्तुगीज भाषांतर गोव्याच्या सरकारी दप्तरांत कांहीं वर्षांपूर्वीं उपलब्ध झालें होतें;[14] ह्या लेखांत कदम्ब राजा जय-

१२ स्प्रेन्जरचें भाषांतर, पृ. २७७; **जर्नल बॉम्बे ब्रॅन्च रॉयल एशियाटिक सोसायटी,** पुस्तक २३, पृ. ३७० पहा. ह्याच संबंधांत शिलाहार अनंतपाल ह्याचा एक मंत्री नौवित्तक वासेद ह्या नांवाचा होता हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे; खारेपाटण ताम्रपट शके ११०५, **इन्डियन ॲन्टिक्वेरी,** भाग ९ पृ. ३३.

१३ **बॉम्बे गॅझेटीयर,** खंड १, भाग १, पृ. १०९; **प्रोसिडींग्स ऑफ दि व्हिएन्ना ओरिएंटल कॉंग्रेस,** पृ. २३०; **डॉ. भाण्डारकरांची प्राचीन लेखांची यादी** क्र. १२२०.

१४ हे उतारे व भाषांतर प्रो. पांडुरंग पिसुर्लेकर ह्यांनीं O Oriente Portugesas मासिक पुस्तकांत क्र. २२ पृ. ६–१८ ह्यावर १९३८ मध्यें प्रसिद्ध केलें होतें. परंतु छपाईच्या निष्काळजीपणामुळें त्यांत बहुसंख्य चुका आढळतात. प्रो. मोराएस ह्यांनींही ह्या भाषांतराचा **कदम्ब–कुल,** यांत पृ. १६८–१७०, १८६ वगैरे ठिकाणीं उपयोग केलेला दिसतो.

केशी ह्यानें सदनो[१५] म्हणजेच प्रस्तुत ताम्रपटांतील च्छडम ह्यास त्याने गोव्यांत बांधलेल्या मोठ्या मशिदींच्या व्यवस्थेसाठीं[१६] हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या बंदरांतून गोव्यांत येणाऱ्या जहाजांवर व लहानमोठ्या होड्यांवर कर बसविण्याची परवानगी दिलेली आढळते.

सदरहू ताम्रपटाचे उताऱ्यांत सदनो ( = च्छडम ) ह्यांस जयकेशिनें आपला मुख्य मंत्रि नेमलें असल्याचें सांगितलें आणि आपल्या एतद्देशीय मंत्र्यांना वगळून ( **स्वदेश-सचिवान् त्यक्त्वा** ) त्यास हा दर्जा प्राप्त करून दिला असें म्हटलें आहे. ह्यावरून परकीय लोकांना साहाय्य करण्यांत ह्या कदम्ब राजाचा फार मोठा हात होता असें स्पष्ट होतें.[१७]

राजकीय इतिहासाच्या दृष्टीनें ह्या ताम्रपटांत फारशी माहिती उपलब्ध होत नाहीं व येथें येणारें राजांचें वर्णन केवळ स्तुतीनें भरलेलें आहे. जयकेशिनें, पाण्ड्य, परमार चोल, पल्लव आणि लाट देशच्या राजांवर मिळविलेला विजय, स्वतः जयकेशि व त्याचे वंशज ह्यांच्या उत्कीर्ण लेखांतून आलेला असल्यामुळें त्याचें येथें विवेचन करीत नाहीं.

नाणक शास्त्राच्या दृष्टीनें या ताम्रपटांत दोन महत्त्वाचे उल्लेख आले आहेत. त्यांत निष्क किंवा भैरव; तसेंच पांगे गद्याणक[१८] अशीं दोन प्रकारचीं चालू नाणीं

---

१५ 'सद्नो' हें पोर्तुगीज भाषांतरित नांव मूळच्या अरबी शब्दास **च्छडम**-ह्यापेक्षां अधिक जवळचें आहे.

१६ प्रस्तुत लेखांत मजिदीसाठीं "मिजिगिति" हा शब्द उपयोगांत आणला आहे. **कदम्बकुल** ह्या पुस्तकांत ह्याचें भाषांतर "House of Mercy" असें केल्यामुळें ह्या इमारतीचें नेमकें स्वरूप तेथें ध्यानांत येत नाहीं. परंतु पिसुर्लेकरांनीं दिलेल्या श्लोकांत तिची प्रासादतुल्य रचना, तिच्या भिंतीस प्रतिवर्षी चुना लावण्यासाठीं केलेली योजना, तेथें दररोज होणारी प्रार्थना, तसेच मशिदीच्या खर्चानें अनाथ लोकांची प्रेतें पुरण्याची सोय वगैरे जे उल्लेख आले आहेत, त्यावरून परकीय लोकांनीं आपल्या धर्म संस्थापनार्थ इकडे कसे प्रयत्न चालविले होते हें सहज लक्ष्यांत येईल. मिजिगिती हा मशीद ह्या अर्थी शब्द कें. इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीं ग्रंथमालेंत प्रसिद्ध केलेल्या नांगांव येथील शके १२८९ किंवा हिजरी ७६९ च्या हंबिरराव ह्याच्या शिलालेखांत येतो; तसेच वेरावळ येथील एका शिलालेखांतही हा शब्द वापरला आहे; **भावनगर इन्स्क्रिप्शन्स्**, पृ. २२४. ह्याशिवाय "मुसलमानांचे संस्कृत लेखांतून (इ. स. ७३० ते १२२० ) येणारे उल्लेख" हा श्री. रमाशंकर शास्त्री व अमलानंद घोष ह्यांचा **जर्नल ऑफ इण्डियन हिस्टरी**, पु. १५, पृ. १८१ नंतरचा लेख पहा.

१७ **ओरिएन्त पोर्तुगेस**, ह्यांतील पिसुर्लेकरांनीं दिलेला पाठ पहा.

१८ श्रीयुत ग. ह. खरे ह्यांना प्राप्त झालेल्या कदम्ब ताम्रपटांत देखील "पांगाद्वि गद्याणक विवर्जित" असा मजकूर आहे.

निदर्शित केलीं आहेत. ह्यापैकीं भैरव हीं नाणीं कोणतीं होतीं ह्याविषयीं आतां निश्चितपणें सांगतां येणें शक्य झालें आहे. दोन वर्षांपूर्वी गोवें विभागांत हिंडतांना वेडण्याचे व्हायकाउंट रावराजे श्री. वासुदेव आत्माराम उर्फ काकासाहेब देशप्रभु ह्यांच्या संग्रहांत मला नाण्याच्या एका बाजूवर गजसिंह व दुसऱ्या बाजूवर " श्री मलेगे भैरव " अशीं अक्षरें कोरलेलीं कांहीं सोन्याचीं नाणीं आढळून आलीं होतीं. ह्या नाण्यावरील टिपण मी नुकतेंच प्रसिद्ध केलें असून बहुधा ' भैरव ' म्हणजे याच प्रकारचीं नाणीं येथें अभिमेत होतीं असें दिसतें. पांगे–गद्याणक म्हणजे कोणत्या प्रकारचीं नाणीं हें मात्र नीटसें ध्यानांत येत नाहीं.

प्रस्तुत ताम्रपटाच्या मुद्रेवर देखील "**श्रीमलेगेभैरव**" हीं अक्षरें कोरलेलीं दिसतात. ह्यावरून कदम्ब राजांनीं डोंगराळ मुलुखांतील लोकावर मिळविलेला आपला विजय निदर्शित करण्यासाठीं घेतलेले बिरुद ह्या घराण्याचे लांच्छनाबरोबर वापरलें जात होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ताम्रपटांच्या कड्यांवर काढलेलें राजचिन्ह किंवा लांछन आणि त्याच राजानें पाडविलेल्या नाण्यांवरील चिन्हें किंवा इतर मजकूर यांचें परस्पर साधर्म्य किती आहे हें ह्या उदाहरणावरून दिसून येतें. दक्षिणेंतील पल्लव, चोल इत्यादि राजांच्या ताम्रपटांवरील लांछनावरून त्यांचीं कित्येक नाणीं ओळखण्यास मदत झाली आहे व क्वचित् प्रसंगीं नाण्यावर मजकूर नसला तरी, त्या घराण्याचे लेखांतून येणारें लांछनाचें वर्णन किंवा त्यांनीं वापरलेलीं विशिष्ट चिन्हें यावरून तीं नाणीं कोणीं पाडलीं आहेत याचा अंदाज बांधतां येतो. कोल्हापूरच्या उत्खननांत सांपडलेलीं दोन सोन्याचीं नाणीं त्यावर असलेलें सुवर्णगरुडाचें चित्र व दुसऱ्या बाजूस शिलाहार मारसिंह ह्याच्या ताम्रपटांवर असलेली आकृति यांच्या सहाय्यानें, त्यांवर कोणताही दुसरा मजकूर नव्हता तरी, तीं शिलाहार घराण्याचीच असें ओळखतां आलें.

**स्थळनिश्चयः—** प्रस्तुत ताम्रपटांत **चेमूल्य** ( ओळ ३२ ) **गोपक द्वीप** ( ओळ ३६ ) व **लघुमोराम्बिका** ( ओळ ३६–३७ ) अशीं तीन स्थळें उल्लेखिलीं आहेत; त्यांपैकीं चेमूल्य हें सुप्रसिद्ध चौल बंदर होय. गोपक द्वीप म्हणजे गोवा हें सर्वविश्रुतच आहे. मोराम्बिका हें गांव पणजीच्या जवळच ४ मैलांवर असलेलें मोरम्बी हें हल्लीचें गांव होय. **कदम्बकुलांत** ह्या गांवाचीं माहिती दिली आहे. फक्त चेमूल्य याचें ऐवजीं वेमूल्य असें वाचल्यामुळें तेथें ग्रामनामाची कल्पना आलेली दिसत नाहीं.

## पाठ[1]

[वृत्तें: १, ९, १२, १७–२८, ३०, ३१, ३६ अर्ध, ४२ अनुष्टुभ्; २–४, ६–८, १३, १५ वसंततिलका; ५, १४, ३३ शार्दूलविक्रीडित; ११, १६ स्रग्धरा; १० शालिनी; २९, ३२, ३४–३५, ३७–४१, ४९ आर्या].

पहिला पत्रा; दुसरी बाजू.

(१) ओं[2] नमो महावराहाय ॥ धरोन्नमनसंत्रासप्रविष्टभुजगेस्व(श्व)रं । पायाद्वो नासिकारंध्रं क्रीडाक्रोड-

(२) स्य चक्रिणः ॥ [१॥*] सं(श)म्भोः पुरोन्मथनसंयुगजस्र(श्र) मांबु(बु)विं(विं)दुत्करप्रपतनेन कदम्ब(म्ब)मूले । जातः पुमा।[3]

(३) नसमवि(वी)र्यं विविक्तवीर्यः ख्यातस्त्रिलोचनकदम्ब(म्ब)इति प्रवीरः ॥ [२॥*] तस्मादयं रविसितांसु(शु)कुलप्रसू-

(४) त भूमीस्व(श्व)रोर्ज्जित विलोपनविक्रमाणां । वंसो(शो) विसु(शु)द्धगुणवो(बो)ध धराधिपानामाप्तः परामुदयि-

(५) नीय कदम्ब(म्ब) संज्ञां(ज्ञाम्) ॥ [३॥*] तस्मिन्धरोद्धरण पूज्य वराहमूर्तिः कीर्तिद्युसेव परिवृद्धिविवे[क][4] बुद्धिः । आ-

(६) सीदसे(शे)षरिपुराजसरोजचन्द्रो गूहल्लइत्यभिधया विदितो नरेन्द्रः ॥ [४॥*] वल्गद्गूहनिरुद्ध कीकसर-

(७) स[स्वा]द प्रमोदोद्यत क्रूरध्वान सि(शि)वा विदीर्ण्णवदन त[स्यो]-त्पलामास्र(श्र) यः । यस्याद्यापि निवे-

(८) दयन्ति विजयं प्रान्तप्रतीपोद्धतक्षोणीपालकपालकूटघटनाभीमाः समिद्भूमयः ॥ [५॥*]

(९) व्याघ्रांतकारि चरितादनिमित्ततोपि यस्मादवाप्तनिजवाहन-नास(श)स(श)ङ्का । आकृष्टखड्गलतिका स्र(श्रु) ।[3]

---

१ मूळ ताम्रपटांवरून व ठशाच्या सहाय्यानें

२ चिन्हानें दर्शविला आहे.

३ शब्द पुढील ओळींत संपूर्ण झाला याचें निदर्शक म्हणून येथें दण्ड काढला आहे

४ येथील चौकटी कंसांतील अक्षरें नीटपणें लिहिलेली नाहींत.

( १० ) तभूतसेना मन्ये विमुन्च(ञ्च)नि हिमाद्रितटीं न दुर्गा ॥ [६॥*]
अद्यापि यस्य यस(श)सा धवलीकृते[स्मि]ल्लोकत्रयो—

( ११ ) विजितपार्व्वणचंद्र धाम्ना । मन्येन्य पूरुषधिया गिरिजा गिरी
सं(शं) नालिंगति व्यपगतोल्व(ल्ब)ण ।[३]

( १२ ) कालिमानं ॥ [ ७॥* ] तस्माद्ब(द्ब)भूव चतुरम्बु(म्बु)धिरुद्धभूमेर्भर्ता
सितांचितयसः(शः) प्रसरस्तनूजः । आद्योपि दा–

( १३ ) तृनिकरस्य कुंदवाविद्भिः प्रख्यापितो य इह पष्ठ इति प्रतीत्या
[।८॥*] येन नूतनतां नीतो वाक्या–

( १४ ) नुगुणकारिणा । पुराणतामपि प्राप्तः पुराणार्थकथाविधिः ॥ [ ९॥*]
मुनिव्रतं चीर्ण्णमनेन ती[व्रं] निः –

दुसरा पत्रा, पहिली बाजू

( १५ ) स( श )ल्यमासूत्रयतां च राज्य( ज्यं ) ॥ एतत्तदेकयत्रदद्भुतार्थं
मालानि( नी )तं मत्तकरींद्रयुग्मं ॥ [ १०॥* ] आपूर्वा–

( १६ ) त्तोयरासे( शे )स्तुहिनगिरितटादा च पास्चा( श्चा )त्य सिंधोर–
र्वागवाक्चसेतोर्द्युमणिकुलमही ।[३]

( १७ ) पालदोर्व्वीर्यकेतोः । आगच्छद्भिर्द्ध( र्ध )नार्थं प(प्र)तिपथमपरैः
पूर्ण्णकामैर्व्रजद्भिः पांथैः पं ।[३]

( १८ ) थान एते सततमपि कृता येन नान्यावकासाः( शाः ) ॥ [ ११ ॥*]
स(सं)गरैः[४] सद्गुणैः ख्यातो गंगासु( शु )भ्रांबु( बु ) ।[३]

( १९ ) भिर्भृतः ॥ तद्गांभीर्यजितांभोधिर्मन्ये म्लानत्वमागतः ॥ [ १२॥* ]
अस्मात्प( त्प्र )सन्नमनसः सुकृतैः ।[५]

( २० ) प्रजानां जातः सुतः क्षितिधरोद्धरणैकधुर्यः । संग्रामतामरिपु–
राजपुरं[धि] वृंदासिंदूरता–

( २१ ) रिनिकषो जयकेसि( शि ) देवः ॥ [१३॥*] पांड्यो य परमार–
भारहरणं लाटोद्भटाटा( टो )पहं ॥

( २२ ) चोलोच्चालन मस्तपल्लवरव[ रात्रिं ] चलत्सैनिकैः । अस्योद्दंड–
भुजोर्ज्जिता ।जिवि–

---

३ शब्द पुढचे ओळींत पूर्ण झाला त्याचा निदर्शक दण्ड.

४ हा शब्द संचारैः असाहि वाचतां येतो.

५ दण्ड अनवश्यक.

(२३) जयसासं(शं)कमुत्कंपिताः किष्किन्धाद्रिनिकुंजपुंजितजनाः स्र-(श्रृ)ण्वंति विद्वेषिणः ॥ [१४॥*] पारा।[१]

(२४) दवारतरणस्वनमुद्वहद्भिरासागरं तुहिनसै(शै)ल तटाचराद्भिः। पेपीयते प्रतिदिनं जयिनो[स्य]-

(२५) सैन्यैः सम्मर्द्दकर्द्दमितमंबु(बु) सुरापगायाः ॥ [१५॥*] नौचक्राक्रांतसिं(सि)न्धोर्मुखरितनभसः क्षे-

(२६) पकध्वानतानैः यो विज्यद् प्रवृद्धैर्न्निसि(शि)तस(श)र स(श)तद्रावितद्वेषिणोऽस्मात्। आस्तामुक्तैः

(२७) किमन्यैः(न्यैः) प्रतिजलधिमहाद्वीपनाथप्रमाथैः सं(शं)के लंकानिवासी स्वपिति न हि सुखं या-

(२८) तुधानप्रधानः ॥ [१६॥*] पंचभ्योपि भयं त्यक्तमेकास्मिन्वहति क्षितिं ॥ अस्मिन्नयविदामाद्ये प्रजा-

दुसरा पत्रा; दुसरी बाजू

(२९) भिरभिसागरं ॥ [१७॥*] भ्रूतटं पद्मयारुद्धमवेत्य वदनं गिरा। तदीर्ष्ययैव दोर्द्दंडमस्य स्लि(श्लि)[ष्टं]-

(३०) जयास्त्रि(श्रि)या ॥ [१८॥*] (संध्य)क्षराणि गायन्ति दुर्ग्गवृत्तिरता यतः। अतः कातंत्रिणो जाताः सत्यमे-

(३१) वास्य विद्विषः ॥ [१९॥*] दीनानुक(कं)पनं स्वीयं सर्व्वस्वं यस्य भूपतेः। तदत्यागादयं सन्तः कृपणो-

(३२) [स्त्व]थ दानवान् ॥ [१०॥*] छ॥ स्त्री(श्री) चेमूल्यपुरोत्पत्तिः सा(शा)न्तस्ताजियवंस(श)जः। आसीन्नोवित्तको धी।[६]

(३३) मान्स्री(श्री)मानालियमाख्यया ॥ [२१॥*] अजायत ततः पुत्रो नाम्ना मधुमदो मु[दे]। यो भवलोकने-

(३४) त्राणा(णां) सकलस्च(श्चं)द्रसन्निभः ॥ [२२॥*] ततोप्येष [स*] मुत्पन्नः सूनुच्छडमसंज्ञकः। कोसि(शि)राजाद्व(?)रक्षाणां

(३५) यो भूत्प्रतिव(ब)लोव(ब)ली। ॥ [२३॥*] दुर्ग्ग[ता]त्ति(र्त्ति)हरं दानं द्विषदन्तकरं व(ब)लं। सन्मनोग्राहकं सी(शी)।[६]

(३६) लमभूदस्य मनस्विनः। [।२४॥*] गोपकद्वीपका[स्ये]स्मिन्विषये योस्ति विस्रु(श्रु)तः। लघुमो-

६ ह्या ओळींत शब्द अपुरा राहिला हें दर्शविण्यासाठीं काढलेला दण्ड.

( ३७ ) रम्वि(म्बि)कासंज्ञो ग्रामः सीमामनोहरः ॥ [ २५॥*] आसी-
च्चिरमसौ सू(शू)न्यो ध्वस्त गावंडकान्वयः ग्रामः स

( ३८ ) केसि(शि)राजेन भूपाला दानभोगिना ।[।२६॥*] प्रधानुमतेनै(ने)न कृत्वा मौलमनाकुलं। पौरु[ ष ] प्रा-

( ३९ ) तसामर्थ्यं छडमं मितभाषिणं ।[।२७॥*] एतस्य केसि( शि )-
राजेन छडमस्य व्यवस्छ(स्थ)या। ग्रामो मोरम्वि ( म्बि )।[७]

( ४० ) काख्योसौ प्रदत्तो दलिताद्विषा। [।२८॥* ] चंद्रवसुग्रहनिमिते
सा( शा )के वर्षे विकारिणि प्राप्ते। आषाढ।[८]

( ४१ ) कृष्णपक्षे वारे सस( शश )लक्ष्मणस्तथाष्टम्यां ॥[ २९॥ ] विका-
रिवत्सरादीनि वर्षाणि सत[तं] दश(श)। निष्कांस्तृं(स्त्रिं)स(श)द्दै-

( ४२ ) दैवग्राह्याः प्रत्यद्वं( ब्दं ) भैरवाह्वयाः ॥[ ३०॥* ] ( सं )प्राप्ते वत्सरे
सौम्ये पंचतृं(त्रिं)स(श)च्च भैरवाः। पांगे गद्याणका ग्रा-

तिसरा पत्रा, पहिली बाजू

( ४३ ) ह्या ग्रामेस्मिन्मेदिनीभुजा ॥[ ३१॥* ] काणिकपंचकसंज्ञं दस(श)
व(ब)न्धाद्युपकराख्यमिदं किमपिनो-

( ४४ ) ग्राह्यं नच कार्यं वा( बा )धनमपि किमपि वेद्ट्रिक्षरा[ दि ]
।[।३२॥*] काराकेतकचूतवड विलसद्विधूथिकाक्ष्मारुहास्त-

( ४५ ) द्विभ्राजत नालिकेरतरुभिः प्राक्सीम्नि लोकस्तु(श्रु)ता। अस्त्य-
स्या अपि दक्षिणे द्विपघनं स्त्रोतः शिलामंडलं( लम् )।

( ४६ ) न्यासालक्षतटं ततोपि दृषदां मालास्ति सीमाख(ध्र)या ॥[३३॥*]
याम्ये वरुणनिरुद्धे दिग्भागे खातिका तटस्यस्ता।

( ४७ ) अस्ति तता( तो ) दृषदाली सीमां प्रति वा( बा )दिव(र)वनमु-
दास्ता ॥[ ३४॥* ] तस्याः कन्दणवणमिति सुक्षेत्रं तस्य वारुणी
सीमा। म-

( ४८ ) यौदास्ति सुविदिता तस्या अपि पवनधनददिग्भागे ॥[ ३५॥* ]
पावरखज्जणवनो निकटास्ति सरित्तटे ॥ [ ३६॥* ] [ तदा ]ग्रा-

---

७ शब्द अपुरा राहिला ह्याचा निदर्शक दण्ड

८ दण्ड अनवश्यक.

९ येथें यतिभंग दोष आहे.

(४९) टः ॥ ऐशान्येस्ति निखातो ग्रावाल्यद्‌ग्रामवृद्ध(?)राज्ञया
कल्पास्यखज्जणार्द्धे यत्धान्यम्नूतन[पुंज]र-

(५०) चितं ॥ [३७॥*] प्रतिव(ब)लखज्जणमेतद् ग्रामस्यास्येव सक-
लमायतं । सस्यादिजा[त]विभवे ग्रामेस्मि-

(५१) न्कोपि यदि पुरातनकः । [।३८॥*] एतद्‌ग्रामस्वामी मोदेन
सा(शा)न्तमपि सकंटकं कुरुते । ग्रामक्षेत्रतदूषरडों-

(५२) गरिकापल्वलादिसम्व(म्ब)न्धे ॥ [३९॥*] दद्युः सस्यान्नृपते-
रुचितार्हं[न्तः]।[10] सहस्राहे[11] ॥ इत्येव विदितसीमो(मा) ग्रामो
म[ध्य]-

(५३) स्थ (सु)वृक्षमालाभिः । आचंद्रं भोक्तव्यो वंस्यैः(श्यैः) पुत्रादि-
भिरनेन ॥ [४०॥*] सम्मतधनातिरिक्तां वा(बा)धामवनीस्व(श्व)

(५४) रोति लुब्धात्मा । ग्रामस्यास्य करिष्यति स भविष्यति
नरकभाजनमसत्यः । [।४१॥*] इहलोकेति निंद्यानां

(५५) कृतेषां परलोकिता । पुंसामसु(शु)द्धचित्तानां प्रतिपन्नो स्मर्द्दि-
नाम् । [।४२॥*] एतन्मनोज्ञवचनैर्विरचि-

(५६) तममुनैव विस्व(श्व)रूपेण । व्यवहारपत्रकाविना सा(शा)सन-
मवगम्य मान्यमुचित ह्राः (?)[12]

---

१० दण्ड अनवश्यक

११ ह्या ठिकाणचा पाठ किंचित् दुर्बोध आहे. 'सहश्राहे' हा शब्द कोरणाऱ्याच्या लक्ष्यांत नीट न आल्यामुळें त्यानें अक्षरांचे काने, पृष्ठमात्रा व्यवस्थित रितीनें जोडलेल्या नाहींत. ह्या ठिकाणीं संदर्भावरून येवढाच अर्थ अभिप्रेत होतो कीं (जमिनीच्या मालकांनीं) राजास बाराही महिन्यांतून (सहश्राहे) तो मागेल ते व उचित असे धान्य दिलें पाहिजे. 'सहश्राहे' ह्या शब्दाच्या अर्थासाठीं **एपिग्राफिया इंडिका,** भाग २५, पृ. ८० तळटीप २ पहा.

१२ ह्या ठिकाणचा मजकूर अपूर्ण आहे व पुढें सुमारें ६ अक्षरांची जागा आहे. येथील अक्षरें खोडून टाकल्यासारखीं दिसतात.

# [ ६ ] दिवे आगर येथील मराठी ताम्रपट; शके ९८२

( मो. गं. दीक्षित )

**उपलब्धिः**—प्रस्तुत ताम्रपटाचा हा एक पत्रा मला दिवे–आगर; ता. श्रीवर्धन जंजिरा संस्थान येथील रहिवाशी श्री. स. ना. जोशी–पटवर्धन ह्यांचे कृपेनें मिळाला;[1] कांहीं वर्षांपूर्वीं तो त्याच गावीं एका वाडींत नारळाची झाडें लावीत असतांना एका कुळवाड्यास सांपडला होता. उपलब्ध असलेला पत्रा ६।× ३॥ इंच लांबी रुंदीचा असून त्याच्या एका बाजूस लहानसें छिद्र आहे; व त्यांत एक कडी अडकविलेली आहे. ही कडी अगदी साधी असून तिच्यावर कोणतीही मुद्रा वगैरे नाही तथापि ह्या ताम्रपटा-बरोबर दुसरा आणखी एखादा कोरा पत्रा त्यावरील लिखाण सुरक्षित रहावें म्हणून अडकविलेला असावा असें दिसतें. पत्र्यावर एकंदर नऊ ओळी कोरलेल्या असून त्यावर लेखविषयक सर्व मजकूर पुरा झाला आहे.

**कालः**—ह्या ताम्रपटाचा काल लेखाच्या प्रारंभींच ओळ १–२ मध्यें "शक संवतु ९८२ सर्व्वरी संवत्सरे मार्गशिर पौर्णमास्यां शुक्रे" असा दिला असून गणित-दृष्ट्या ही मिति अगदी बरोबर आहे. त्यादिवशींची इंग्रजी तारीख १० नोव्हेंबर, इ. स. १०६० अशी होती[2] व वार ही लेखांत सांगितल्याप्रमाणें शुक्रवार होता.

**लिपि व लेखन विशेषः**—ह्या ताम्रपटाची लिपि अकराव्या शतकांतील नागरी असून, तो कोरला गेलेल्या काळांतील इतर लेखांशीं अनुरूप अशी आहे. ओळ ३ मधील **नि** व **नें** हीं अक्षरें, तसेंच ओळ १ व ६ मधील अनुक्रमें ९ व ७ हें आंकडे दाक्षिणात्य पद्धतीनें कोरलेले आहेत. ह्या लेखाची भाषा जुनी मराठी असून त्यांत पुढील लेखन-विशेष नमूद करण्यासारखे आहेत. सर्वत्र **स** व **श** ह्यांत भेद केलेला असून ओळ १ मधील सर्व्वरी, व ओळ ३ मधील सासनें हे शब्द त्यास अपवाद दिसतात. लेखांत स्वर-युक्त ऐ ज्या ज्या ठिकाणीं आहे त्या त्या ठिकाणीं बहुधा पृष्ठमात्रा उपयोजिली आहे, परंतु एकार दर्शवितांना सर्वत्र वेलांटीचा उपयोग केला आहे. मात्र शेवटच्या ओळींतील **जें, तें, मे** हीं तीन अक्षरें त्यास अपवाद आहेत. ह्या लेखांत दोन ठिकाणीं शब्दांचा संक्षेप आद्याक्षरापुढें लहानसें वर्तुळ किंवा विसर्ग काढून सूचित केला आहे. ओळ ६ मध्यें **सु० गाः** हा **सुवर्ण्ण गद्याणकाः** ह्याचा संक्षेप आहे. त्यांत अंत्याक्षर दीर्घ असल्यामुळें **ग** चे **गा** असें रूप केलें आहे. ही पद्धति अलिकडे पेशवेकालीन मोडी

---

१ ह्या ताम्रपटावरील माझा परिचयात्मक लेख "मराठी भाषेंतील आद्य ताम्रपट" ह्या शीर्षकाखालीं **सह्याद्रि**, जून १९४९, पृ. ३३४–३३६ ह्यावर प्रसिद्ध झाला आहे.

२ पिल्ले, **इंडियन एफिमेरीज**, भाग ३, पृ. १२३.

कागदपत्रांतही प्रो = प्रमाणे; प्रां = प्रांत वगैरे शब्द लिहितांना अनुसरलेली दिसते. ओळ ६ मधील **सुव्र्वः** हा शब्द **सुवर्ण्ण** ह्याचा संक्षेप आहे, व त्यांत व चे झालेले द्वित्व चिंतनीय आहे. सर्व्वरी ( ओळ १ ), मार्ग्गसिर ( ओळ २ ) आणि सुवर्ण्ण ( ओळी ५ व ९ ) ह्यांतही र कार आला असतां व्यंजनाचे द्वित्व झाल्याचीं उदाहरणें आहेत.

**भाषाः**—ह्या लेखाची भाषा प्राचीन मराठी आहे, व त्या दृष्टीनें या लेखांतील पुढील विशेष अभ्यासनीय आहेत. कित्येक ठिकाणीं अनुनासिकाचा उपयोग वारंवार केला आहे. स्थितिपुरिची हा शब्द ओळ २ मध्यें **स्थितिपुरिचीं** असा लिहिला आहे; **सासनें** ( ओळ ३ ), **ठवियलीं**( ओळ ५ ) व **ठवियलें** ( ओळ ६ ) हीं रूपें अशीच आहेत. **सासनें** ( ओळ ३ ) ह्यांत अनुस्वारानें अनेकवचन निदर्शित झालें आहे; पण ओळ ४ मधील **प्रमुखें स्थानें** ह्यांत सप्तमी विभक्तीसाठीं अनुस्वाराचा उपयोग केला आहे. **पासेः** ( ओळ ५ ) व **दावोदरः** ( ओळ ६ ) ह्यांत विसर्गाची जरूरी नसतांना तो वापरला आहे. **संवतु** ( ओळ १ ), **योगक्षेमु** ( ओळ ७) आणि **देवलु** ( ओळ ९ ) हीं उकारान्त नामें प्राचिन मराठी भाषेंत आढळणाऱ्या पद्धतीस अनुसरून आहेत.

**सारांशः**—हा ताम्रपट कोरण्याचा हेतू खाजगी स्वरुपाचा म्हणजे एखाद्या राजानें दिलेलें दान नमूद करण्याचा नाहीं. तर केवळ एका गांवांतील ब्राह्मणानें ( वासुदेव भट्ट ) बहुशः त्याच्या जवळ असलेलें स्थितिपुरी ह्या गांवासंबंधीचे दोन ताम्रपट ( शासनें ), ऋषीयप्प घैसास, सिधू षडंगविदु हे प्रमुख असलेल्या मुख्य सभेंत ( स्थान ) मावलभट्ट नांवाच्या इसमाजवळ ठेवले. १२७ सोन्याचीं गद्याणक नांवाचीं नाणीं सभेचा योगक्षेम नीट चालावा म्हणून दावो(मो)दर नांवाच्या इसमास दिलीं व हें सर्व दिवे गांवच्या ऋषियप्प, पद्मदेव षडंगविदु, तिके षडंगविदु, जीवणे, नागरुद्र भट्ट, मधुवै षडंगविदु व मधुवय देवल ह्यांना ठाऊक आहे. तसेंच जीं सुवर्णाचीं नाणीं लिहिलीं तीं सर्व एका कंठ्यांत ( ओंवलेलीं ) आहेत.[1] असा मजकूर ह्या ताम्रपटांत आला आहे.

**चर्चाः**—प्रस्तुत ताम्रपटांतील मजकूर अगदी मामुली स्वरुपाचा असला तरी तो सर्व मराठी भाषेंत लिहिलेला आहे ह्यांतच त्याचें वैशिष्ट्य आहे. माझ्या समजुतीप्रमाणें संपूर्णपणें मराठींत लिहिलेला इतका मोठा व जुना ताम्रलेख आतांपर्यंत सांपडलेला दिसत नाहीं. म्हैसूर संस्थानांत श्रवणबेळगोळा येथील गोमटेश्वराच्या प्रचंड मूर्तीखालीं कोरविलेलें "श्री चावुण्डराजे करवियलें" हें वाक्य,[2] त्यांत प्रत्यक्ष काळाचा निर्देश

---

१ ह्या ठिकाणच्या मजकूराचा नीट अर्थ लागत नाहीं.

२ **एपि० कर्नाटिका**, भाग २ पृ. ९३; **एपि० इंडिका** भाग, ७, पृ. १०९ ह्याशिवाय, प्रो. दत्तो वामन पोतदार ह्यांचे प्रस्तुत लेखावरील "पहिला ज्ञात मराठी शिलालेख," **महाराष्ट्र साहित्य पत्रिका**, अंक ६३ ( जुलै १९४२ ), हें विवेचन पहा

नसला तरीं त्यांत उल्लेख केलेल्या गंगराजाच्या प्रधानाच्या नांवावरून, अदमासें इसवी सन ९८३ मधील आहे; व मराठी भाषेंतील आद्य **शिलालेखाचा** मान ह्याच लेखाकडे जातो. परंतु ताम्रपटावर व कालाचा उल्लेख अगदीं स्पष्ट असलेला प्राचीन मराठी लेख असा हा पहिल्यानेंच उपलब्ध होत आहे, त्यामुळें **मराठी भाषेंतील आद्य ताम्रपट** असें ह्या ताम्रपटास सध्यां तरीं आणखी प्राचीन लेख उपलब्ध होईपावेतो संबोधण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं.[1]

त्यामुळें भाषेच्या दृष्टीनें तर ह्या लेखाचें महत्त्व आहेच, परंतु त्यांत उल्लेखिलेल्या इतर कांहीं गोष्टीही तत्कालीन समाज-परिस्थितिवर प्रकाश पाडणाऱ्या आहेत. ह्या लेखांत एका गांवाविषयींचे दोन ताम्रपट एका व्यक्तीनें वेदवेदांगादि षट्कर्में जाणणारे कांहीं लोक प्रमुख असलेल्या सभेंत ते दुसऱ्या एका व्यक्तीजवळ अर्थात् विश्वासानें ठेवले; तसेंच त्या सभेचा योगक्षेम नीट चालावा म्हणून १२७ सोन्याची नाणींही पण दुसऱ्या एका इसमाजवळ ठेवावयास दिली ह्या घटनेवरून तत्कालीन समाजांतील ह्या सभेचें स्वरूप समजण्यास चांगली मदत होते. ह्या सभेंतील प्रमुख लोक चांगले व्युत्पन्न असून त्यांतील बऱ्याच जणांना 'षडंगवि' अशी उपाधि लावलेली आहे. ह्या लेखांत येणारीं ब्राह्मणांची नावें देखील भाषेचें उत्क्रांत स्वरूप कसकसें होत जातें हें समजण्यास फार उद्बोधक आहेत. रिसियप्प हें नांव मूळ संस्कृतांतील ऋषि पै पासून ऋषियप्प–रिसियप्प–रिसियप्प ह्या अवस्थांतून परिणत झालें आहे, तर पौंवदेव हें नांव पद्मदेव, पउमदेव, पौवदेव, पौंवदेव असें साधलें आहे. ह्या लेखांत दोन ठिकाणीं घैसास व देवल अशीं ब्राह्मणांचीं आडनांवेंहीं पण आलीं आहेत. पैकीं घैसास ह्या आडनांवाचा (१) इतिहास फार जुना आहे. शके ७३० मध्यें कोरलेल्या राष्ट्रकूट घराण्यांतील राजा तिसरा गोविंद ह्याच्या राधनपूर[2] ताम्रपटांत हें नांव प्रथम **गहियसाहस** ह्या स्वरूपांत प्रथम आढळतें; तेथें दान दिलेल्या ह्या ब्राह्मणाचें गोत्र भारद्वाज असें दिलेलें आहे. त्यानंतर राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष ह्याच्या संजाण[3] ताम्रपटांत शके ७९३ मध्यें ही वडुमुख व वत्स गोत्री ब्राह्मणांना गहियसाहस असें म्हटलें आहे. शके ११०० नंतरच्या ताम्र–शिलालेखांत तर घैसासाचे उल्लेख पुष्कळ वेळां येतात; त्यांतल्या

---

१ प्रस्तुत लेखकानें ह्याच ग्रंथमालेंत (**द. म. इ. सा. खण्ड ३**, पृ. ६१) शके ११२४ मध्यें कोरविलेला जैत्र सावंताचा एक संपूर्ण मराठी ताम्रपट प्रसिद्ध केला होता; मराठी भाषेची उत्क्रांति दाखविणारे वेगवेगळ्या कालांतील सर्व ताम्रपट व शिलालेख, त्यांच्या प्रतिकृतींसह, पुणें विद्यापीठातर्फे, प्रस्तुत लेखक व डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांचे सहकार्यानें लौकरच प्रसिद्ध होणार आहेत.

२ **एपिग्राफिया इंडिका,** भाग ६. पृ. २४२

३ **एपिग्राफिया इंडिका,** भाग १८, पृ. २३५

त्यांत शके ११७१ मधील चिक्कबागेवाडी[1] ताम्रपटांत तर घैसासोपनामकांची आत्रेय, काश्यप, कौंडिण्य, गौतम, जामदग्न्य–वत्स, भारद्वाज, मूक, रथितर, वासिष्ठ, विश्वामित्र, शांडिल्य, शौनक, श्रीवत्स इत्यादि गोत्रनामें नमूद केलेलीं आढळतात. नानाविध गोत्रांतील ह्या उल्लेखांवरून, पूर्वी घैसास ही वृत्तिदर्शक पदवी असली पाहिजे असा निष्कर्ष काढणें चूक होणार नाहीं. हल्लीं मात्र घैसास हें आडनांव म्हणून चित्पावन, तसेंच क्वचित् देशस्थ ब्राह्मणांतही आढळतें.

देवल हें हल्लींचें आडनांव देखील देवलक=देवळांतील पुजारी, ह्या वृत्त्यर्थक नांवावरून पडलेलें दिसतें. हें नांवही किती प्राचीन आहे तें शोधलें पाहिजे.

प्रस्तुत ताम्रपटांत स्थितिपुरीच्या शासनाबद्दल जी व्यवस्था झाली, ती कांहीं प्रमुख ब्राह्मण विद्वान असलेल्या सभेंत तर झालीच, परंतु तीस साक्षिदार म्हणूनही सात ब्राह्मणांचीं नांवें येथें दिलीं आहेत. सामान्य व्यवहारासही तो चारचौघां समक्ष पुरा करण्याचा वहिवाट आपल्या देशांत फार पूर्वीपासून आहे. इतकेंच नव्हे तर आपल्या देशांशीं संबद्ध असलेल्या इतर देशांतूनही ती आढळते. चिनी तुर्कस्थानांत विख्यात संशोधक सर ऑरेल स्टाइन ह्यांनीं संशोधलेले, जुन्या खरोष्ठी भाषेंत लिहिलेले, इसवी सनाच्या तिसऱ्या चवथ्या शतकांतील कित्येक लाकडी फलक सांपडले आहेत, त्यावरही देवघेवींचा व्यवहार पुरा करतांना अनेक साक्षीदारांचीं नांवें दिलेलीं आढळतात[2]. असो.

**स्थळनिर्देशः—** ह्या ताम्रपटांत फक्त दोनच स्थळांचा उल्लेख आला आहे. त्यांपैकीं **दिवे**, हें प्रस्तुत ताम्रपट सांपडला तें दिवे–आगर होय ह्यांत संशय नाहीं. शके ११७६ मधील एका शिलालेखांत हेंच गांव द्विपकग्राम म्हणून उल्लेखिलें आहे.[3] दुसरें गांव **स्थितिपुरी** ( ओळ १ ). ह्या गांवाविषयींचा कांहींच तपशील लेखांत दिला नसल्यानें तें नेमकें कोणतें हें ओळखण्यास साधन नाहीं. तथापि सर्व्हे ऑफ इंडियाचे नकाशांत दिव्यापासून उत्तरेस ३ मैलांवर 'स्थिन' नांवाचें ठिकाण दिसतें, तेंच बहुधा येथें अभिप्रेत असावें.

---

१ **इंडियन ॲन्टिक्वेरी,** भाग ७, पृ. ३०४; यादव कृष्णाच्या ह्याच वर्षांतील बेंडेगेरी ताम्रपट, **इंडियन ॲन्टिक्वेरी,** भाग १४, पृ. ६९, ह्यांतही अनेक घैसासोपनामकांचीं नांवें सांपडतात.

२ उदाहरणार्थ, ऑरेल स्टाइन, **सेरिंदिया,** पृ. २६१; प्रतिमापत्र २३, ह्यांतील ( BRS, No. 79 ) हा फलक पहा.

३ प्रस्तुत लेखकाच्या **महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख,** ह्या पुस्तकांतील क. ८ चा लेख; पृ. ८५–८८; दिवे–आगर गांवांत धजेचा शिलालेख म्हणून ओळखला जाणारा एक शिलालेख आहे. तो बुऱ्हाण निजामशहाच्या वेळचा असून ( इ. स. १५०९–१५५३ ) त्यांत 'दिवा' ह्या परगण्याचा उल्लेख आहे.

## पाठ[1]

(१) ओं[2] स्वस्ति शक संवतु ९८२ सर्व्वरी[3] संवत्सरे मा-
(२) र्गसिर[4] पौर्णमास्यां शुक्रे ॥ श्रीस्थितिपुरिचीं दो-
(३) नि सासनें[5] वासुदेवभट्ट वांये[6] षडंगवि रिसिय[प्प]
(४) घैसास सीधू[7] षडंगवि एतत्प्रमुखें स्थानें मावलभ-
(५) ट्टं पासे:[8] ठवियलीं ॥ तथा सातावीसें शत सुवर्ण्णः[9] दा-
(६) वोदरः[8] पासि ठवियलें । सु० गाः[9] १२७ सुर्व्वः[10] योगक्षे-
(७) मु स्थानहचा[11] । दीवेचे रिसियपै पौंवदेव षडं[ग*]वि[12] तिकै
(८) षडंगवि जीवणे नागरुद्रभट्ट मधुवै षडंगवि मधुव-
(९) य देवलु हे जाणति । जें सुवर्ण्ण लिहलें तें कांठेअः[13] समेतः ॥

---

१ मूळ ताम्रपटावरून.

२ चिन्हानें दर्शविला आहे.

३ **शार्व्वरी** असें वाचावें.

४ **मार्गशीर्षे** असें वाचावें.

५ **शासनें** असें वाचावें.

६ **भट्टवांय** असा शब्द जोडून वाचला तर तो **भट्टपाद** ह्या अर्थी घेतां येईल; वेगळा व सुटा वाचला तर " वाय षडंगविद् " असें दुसऱ्या आणखी एका ब्राह्मणाचें नांव तेथें अभिप्रेत आहे असें समजावें लागेल.

७ ' सह्याद्रि ' मधील माझ्या लेखांत हें नांव सीवू असें वाचलें होतें. परंतु **ध**चे ह्या लेखांतील वळण पहातां सीधू हा पाठ अधिक चांगला वाटतो. सिधू=सिद्ध.

८ विसर्गाची जरूरी नाहीं. हल्लींचें रूप दावोदरा[c] असें होईल.

९ **सुवर्ण्ण गद्याणकाः** ह्याचा संक्षेप; पूर्वीच्या ओळींत ' सातावीसें शत ' हा शब्द नसता तर हा संक्षेप ओळखणें कठीण झालें असतें.

१० **सुवर्ण्ण** ह्याचा चुकीचा संक्षेप.

११ ' **स्थानाचा** ' असें वाचावें

१२ **षडंगवि** ह्यांतील **ग** चुकीनें गळला आहे.

१३ **कांठेअः** ह्या अक्षरांच्या वाचनाबद्दल कोणत्याहि प्रकारची शंका नाहीं; परंतु त्याचा निश्चित अर्थ काय घ्यावयाचा हें समजत नाहीं. कदाचित् 'कांठ' हें एखाद्या विशिष्ट आकाराच्या भांड्याचें नांवही असूं शकेल. वर लेखांत ही नाणीं एखाद्या कंठ्यांत ओवून दिलीं असतील असें म्हटलें आहे. पण एकंदरीत ह्या वाक्याचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं हेंच खरें.

# [ ७ ] कदंब त्रिभुवनमल्लकालीन एक ताम्रपट शक १०२८

( श्री. ग. ह. खरे, क्युरेटर, भा. इ. सं. मंडळ, पुणें )

**उपलब्धिः**— प्रस्तुत ताम्रपटाचे फोटो व मोजमापें माझ्या एका साधुशील मित्रानें मला दिलीं. ताम्रपट अस्सल असल्याची खात्री असल्यानें तो येथें संपादन करीत आहे.

**वर्णनः**— या ताम्रपटाचे ९″ × ६″ लांबीरुंदीचे तीन पत्रे असून ते एका वाटोळ्या कडींत ओवले आहेत. या कडीचीं दोन्ही टोकें एका गट्टूंत पक्कीं बसविलीं असून त्या गट्टूवर उठावाचा वामावर्ती सिंह काढला असावा. कडी सुमारें अर्धा इंच जाडीची असून तिचा व्यास सुमारें दोन इंच असावा. जोडावरील मुद्रेचा व्यासही तेवढाच असावा असें फोटोवरून दिसतें. पत्र्यांच्या कडा दोन्ही बाजूंनीं उंचावलेल्या असल्यामुळें लेखन सुरक्षित आहे. पहिला व तिसरा हे पत्रे फक्त आंतल्या बाजूंनीं व मधला दोन्ही बाजूंनीं खोदलेले आहेत. चार बाजूंवर अनुक्रमें १२, १२, १२ व ११ अशा एकंदर ४७ ओळी आहेत.

**अक्षरवटिका व लेखनपद्धतिः**— हा लेख नागरी लिपींत कोरलेला असून अक्षरांचें वळण इसवी सनाच्या अकराव्या शतकांतील दक्षिणी पद्धतीचें आहे. ताम्रपटाच्या शेवटच्या दोन ओळी इतर अक्षरांहून भिन्न वळणाच्या, ठोसर व मागाहून कोरलेल्या दिसतात. मूळ लेखांतील कित्येक अक्षरांच्या शिरोभागीं आडवी रेघ काढतेवेळीं दोन्ही बाजूंस खालीं येणारे दोन परिशेष जोडले आहेत. कांहींच्या फक्त डाव्या बाजूस व क्वचित् दंडाच्या वरच्या बाजूस असेच परिशेष आहेत. **ध** ह्या अक्षरांत दोन प्रकारचीं वळणें उपयोजिलीं आहेत. एक रूप ओळ ९, ११ वगैरे मध्यें असून तें 'व' अक्षराशीं जुळतें असें दिसतें; तर इतरत्र तें तत्कालीन लेखास अनुसरून ओळ ४, ३४, ४०, ४१ ह्या मधील वळणाप्रमाणें तिरपी रेघ व वर्तुळ ह्यांच्या संयोगानें झाल्याचें दाखविलें आहे. लेखांत **ध** आणि **व**, **भ** आणि **त**, **प** आणि **ए**, तसेंच **ण** आणि **ल** ह्यांचीं वळणें इतकीं एकसारखीं आहेत कीं, अगदीं बारकाईनें पाहिल्याशिवाय त्यांतील सूक्ष्म फरक एकदम नजरेस येत नाहीं. तसेंच जागजागीं अनुस्वारांसाठीं उपयोजिलेलीं टिंबें इतकीं लहान व उथळ कोरलेलीं आहेत कीं, त्यांचें अस्तित्व सहज उमगून येत नाहीं. लेखांत 'ब' साठीं 'व' चा उपयोग सरसहा केला आहे. तसेंच 'श' साठीं 'स' हीं क्वचित् वापरलेला दिसतो. मात्र **शासति** ( ओ. २२ ) व **शासन** ( ओ. ४५ ) हे शब्द 'शाशति' व 'शाशन' ह्या स्वरूपांत आले आहेत. **र** नंतर आलेल्या व्यंजनांचे कांहीं ठिकाणीं द्वित्त केलेलें आढळतें.

**भाषाः**—याची भाषा पद्यमय शुद्धाशुद्ध संस्कृत आहे. यांत एकंदर ४७ कविता असून ४३ वी शालिनी वृत्ताची व बाकी अनुष्टुभ् वृत्तांत आहेत. यांतील **खली** (ओ. ३) **घैसास** (ओ. १४, १७), **पट्टवर्धन** (१७, १८), **पाङ्ग** (ओ. २७) हे शब्द लक्ष्य आहेत. गोवें प्रांतांतील तिसवाडी महालाच्या साधारणतः उत्तर-दक्षिण सीमांवर अनुक्रमें मांडवी व जुवारी या नद्या किंवा खाड्या असून त्यांना जोडणारी एक दक्षिणोत्तर निरुंद पाण्याची पट्टी किंवा नळी आहे. तिला नकाशांत कुंभारजुवेंची खळी असें नांव दिलें आहे. तेव्हां असें वाटतें कीं, पाण्याच्या लांब पण निरुंद अशा पट्टीला **खली—ळी** म्हणत असावे. आणि या पट्टीवर वस-लेल्या गांवास त्या खळीचें नांव मिळत असावें. घोडें हें गांव व घोड ही नदी आहे. त्यांपासून घोडनदी हें नवीन नांव व गांव तयार झालें. राक्षसखली, नोआखली, खोलाखली अशीं नांवें असलेलीं बेटें व पाण्याच्या नाळी बंगालच्या दक्षिण किनाऱ्यालगत सध्या आहेत. तद्वत् पःजाणि हें गांव व त्याच नांवाची खली यांपासून पःजणिखली हें नवें नांव व गांव तयार झालें असावें. घैसास व पट्टवर्धन हे दोन्ही शब्द आज आडनांवें बनलीं आहेत. मूलतः ते शब्द व्यवसाय किंवा अधिकार दाखविणारे असावे. या दोन्ही शब्दांचे याहून प्राचीन निर्देश इतरत्र आले आहेत. उदाहरणार्थ, पट्टवर्धन शब्द कदंबवंशी २ ऱ्या गूहल्लदेवाच्या श. ९६० च्या सावई—वेरे ताम्रपटांत[1] आला असून, घैसास शब्द गर्हियसहास या स्वरूपांत राष्ट्रकूटवंशी पहिल्या अमोघवर्षाच्या श. ७९३ च्या संजाण ताम्रपटांत[2] आला आहे. पण यांच्या अशा इतर उल्लेखांवरूनही अर्थाचा स्पष्ट बोध होत नाहीं.

पांग शब्दाचा निश्चित अर्थ काय असेल तें सांगतां येत नाहीं. पण एखादा कर असावा असें वाटतें. याचा निर्देश याच्या मागल्या एका लेखांत आला आहे. पण त्यावरूनही त्याच्या अर्थाचा उलगडा होत नाहीं.

**ताम्रपटांतील माहिती व चर्चाः**—यांत आरंभीं विष्णूची स्तुति असून नंतर कदंबवंश, त्यांतील राजे, त्यांचा अधिकारी, दानाचा तपशील इत्यादि माहिती आली आहे ती अशी—त्रिपुरासुरास जिंकणाऱ्या शंकराच्या वीररसापासून त्रिलोचन नावाचा पुरुष उत्पन्न झाला व त्यानें कदंबवृक्षाचा आश्रय केल्यामुळें त्याचें कदंब हें कुलनाम बनलें. त्याच्या वंशांत षष्ठ झाला. त्याचा चाकर कालपा हा पःजणिखली येथें होता. षष्ठापासून जयकेशी झाला तर कालपापासून नागान ( नागण ) झाला. जयकेशीचा मुलगा त्रिभुवन-मल्ल आणि नागणाचा मुलगा गंडगोपाल केलिम. अशा प्रत्येकीं तीन पिढ्या दिल्या आहेत. प्रस्तुत कदंब वंशावळीविषयीं थोडी चर्चा करणें आवश्यक आहे. गोव्या-च्या कदंबांच्या अनेक ताम्रपटांतून मूळ पुरुष त्रिलोचन कदंब सांगितला आहे तद्वत् येथेंही आहे. तदनंतर विविध ताम्रशासनांत या कुळांतील विविध पुरुष उल्लेखिले असले

---

१ **महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख**, पृ. ६६.

२ **एपि. इंडिका**, भाग १८, पृ. २४९

तरी एका षष्ठाचा मुलगा १ ला जयकेशिन् याबाबत सर्वांची एकवाक्यता आहे. या ताम्रपटांत १ ल्या जयकेशीचा मुलगा त्रिभुवनमल्ल म्हणून सांगितला असून त्याच्या कारकिर्दीत प्रस्तुत शासनांतील दान झालें आहे. इतर अनेक ताम्रपटांत १ ल्या जयकेशीला १ ला विजयादित्य किंवा विजयार्क नांवाचा एकच मुलगा असून त्यास चट्टलदेवी नांवाची एक बायको होती असें सांगितलें आहे. उलट बेळगांव जिल्ह्यापैकीं संपगाव तालुक्यांतील कादरोळी येथील श. १०२१ बहुधान्य संवत्सर या कालच्या शिलालेखांत कदंब महामंडलेश्वर गूवल याचा उल्लेख आहे.[1] सेवेलनें हा विजयादित्याचा भाऊ असें गृहीत धरलें आहे.[2] मला स्वतःस त्रिभुवनमल्ल ही पदवी किंवा हें अलंकारिक नांव विजयादित्याला उद्देशून वापरलें आहे असें वाटतें. पहिला व दुसरा जयकेशी यांच्या मुलाचें नांव विजयादित्य असें होतें. तिसऱ्या जयकेशीच्या मुलाची त्रिभुवनमल्ल ही पदवी होती.[3] तेव्हां असें वाटतें कीं, दोन्ही विजयादित्यांनाही ही पदवी असावी. विजयादित्य=त्रिभुवनमल्ल हें समीकरण गृहीत धरलें तर पहिल्या विजयादित्याचा हा पहिलाच ताम्रपट प्रकाशांत येत आहे आणि त्याच्या काळांतील एक मिति आपणांस मिळाली असें म्हणतां येतें. कांहीं असलें तरी हा त्रिभुवनमल्ल राज्य करीत होता हें या लेखाच्या २२ व्या ओळीवरून अगदीं स्पष्ट होत आहे. या लेखाच्या योगानें कदंबकुलाचें एक नवीनच चाकरमाने घराणें प्रकाशांत येत आहे. केलिमानें आपल्या धन्याच्या कृपेनें शत्रूस जिंकून गोपकामध्यें पूर्तधर्माचें आचरण केलें. त्यांतील एक म्हणजे गंडगोपाल नांवाचा बांध घातलेला तलाव करून ब्रह्मपुरी वसविली हें होय. तेथें त्यानें बारा ब्राह्मण कुटुंबें आणून त्यांस वृत्ति लावून दिल्या. त्या ब्राह्मणांचीं वसतीचीं गांवें, गोत्रें, आजा, बाप व स्वतः यांचीं नांवें, त्यांचा व्यवसाय, यांचा तपशील पुढील पृष्ठावरील तक्त्यांत दिला आहे. या ब्राह्मणांच्या तीन पिढ्या येथें सांगून शिवाय त्यांचे व्यवसायही निर्देशिले आहेत. पैकीं क्र. २ ते ९ ब्राह्मणांचे व्यवसाय राजघराण्याशीं संबद्ध होते. कोणत्या हें सांगितलें नसलें तरी अनुसंधानानें येथें गोव्याचें कदंब राजघराणें विवक्षित आहे हें सांगावयास नकोच. या काळांत बहुतेक व्यवसाय आनुवंशिक पद्धतीनें चालू असल्यानें येथील दान घेणाऱ्या ब्राह्मणांचे वडील व आजे तेच व्यवसाय करीत असतील किंवा यांच्या वंशजांनींही बहुधा हेच व्यवसाय पुढें चालू ठेविले असतील. प्रत्येक पिढीस पंचवीस वर्षें धरलीं तर सुमारें १०० वर्षांत या ब्राह्मणांच्या चार पिढ्या होतील. तेव्हां श. ९५० ते १०५० या दरम्यानचे गोव्याच्या कदंबांचे लेख तपासल्यास यांतील कांहींचे तरी निर्देश सांपडावे असा अदमास आहे. असो.

---

१ बॉंबे गॅझेटियर, खंड १, भाग २, पृ. ५६८.

२ सेवेल, दि हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन्स ऑफ सदर्न इंडिया, पृ. ३५४.

३ बॉंबे गॅझेटियर, खंड १, भाग २, पृ. ५६८, ५६९, ५७१.

| गांव | गोत्र | पितामह | पिता | पुत्र = प्रतिगृहीता | व्यवसाय |
|---|---|---|---|---|---|
| १ किसूर | शंख | अण्णय्यभट्ट | पोम्मणार्यक | सोमार्य | अथर्वन्; शान्तिकपौष्टिकांत (मंत्रतत्रांत) मुख्य |
| २ ——— | भालंदन | माधवार्य | रेवदास | जयन्तभट्ट | राजांचे पौराणिक (उपर्युक्ताच्या शाखेचे) |
| ३ आम्र(म्र)घण | भारद्वाज | साविणार्य | शांत | मय्याल | राजांचे ज्योतिषी |
| ४ वेर | कौशिक | सोमभट्ट | म्हालय्य दीक्षित | ईश्वरार्य द्विवेदी | राजांचे धर्माधिकारी |
| ५ ——— | ,, | परमेश्वर | नारायणभट्ट | केशवार्य + सोमार्य | राजांचे गुरु |
| ६ पिंपियल | भरद्वाज | अज्जमार्य | नाग | वामनभट्ट | राजांचे अश्ववैद्य |
| ७ सिरूर | वत्स | तिक्कय्य घैसास | वामनार्य | अज्जमभट्ट | राजांचे पुरोहित |
| ८ कुलत्थाली | शांडिल्य | म्हालपार्य | नारायणार्य | म्हालय्य | राजांचे विद्यागुरु |
| ९ ,, | ,, | म्हालपार्य | त्रिविक्रमभट्ट | नारायणार्य | राजांचे धर्माधिकारी |
| १० कपिलक | वत्स | वासलार्य | वातय्य | अज्जल घैसास | वेदांतील पट्टवर्धन |
| ११ ,, | कौशिक | शांतिभट्ट | पत्तय्य | गोविंद क्रमवित् | याजकांतील पट्टवर्धन |
| १२ ,, | आत्रि | गोविंद द्विवेदी | विष्णु पंडित | गोविंद द्विवेदी | याज्ञिकांतील श्रेष्ठ |

या ब्राह्मणांचा सकुटुंब निर्वाह चालावा म्हणून केलिमानें विविध गांवांत कांहीं शेतें व बागा विकत घेतल्या त्यांचा तपशील असा—

| देशभाग | गांव | शेत-बाग | विक्रेता | विक्रीची किंमत |
|---|---|---|---|---|
| १ गोव द्वीप | नेऊर | सुपारीचें आगर | ग्रामदेवत | १०० |
| २ —— | पल | असोली<br>चिंचखंडी | कुलस्थालीच्या सामंताचा पुत्र मालपव्य | प्रत्येकीं १०० |
| ३ अंतुरज | मडक | गाली, शत्त(न्त?)क<br>वेल्लोर, मज्झिखंड | —— | ५०० |
| | | करःजालींतील ३ पत्ति | १ ग्रामवासी;<br>२ पत्तव्यसुत नाएण;<br>३ पत्तव्यसुत तिक्कव्य | १=१००<br>२=५०<br>३=५० यांचे मोठे भैरव गद्याण १०५ होतात ? |
| | | होड्डु खज्जणक | प्रथम नन्नपव्य, नंतर नाव्य. | ३०० |
| ४ षट्षष्टि | कुडत्तरी | कोंढलक | —— | ३०० |
| ५ ,, | राइग्राम(राइ) | पय्यावव्य | —— | १५० |

केलिमानें उपर्युक्त बारा ब्राह्मणांचे पाय धुतले आणि त्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं उपभोग घ्यावा म्हणून उपर्युक्त शेतें व बागा त्यांस दान केल्या. या दानाच्या भोगवट्याविषयीं त्यानें नियम केले ते असेः ( १ ) जमीनी व घरें हीं सर्वांची समाईक मिळकत असावी. ( २ ) त्यांतून येणारें उत्पन्न सर्वांनीं सारखें वाटून घ्यावें. ( ३ ) मिळकत समाईक असल्यानें ती विकणारा व घेणारा यास प्रत्येकीं ५०० चा दंड करावा. ( ४ ) आपल्या वाट्यास आलेल्या घरांत वाटेकरी राहील तोंवर त्यास वाटा मिळावा; पण तो घर सोडून गेल्यास त्याचा वाटा इतरांनीं घ्यावा. ( ५ ) निर्धनी झालेल्या घरांत शेजाऱ्यांच्या संमतीनें नवीन मनुष्य आणून ठेवावा. जबरदस्तीनें राहणारास १०० चा दंड करावा.

नंतर त्यानें एक भारती किंवा सरस्वतीचें मंदिर उभारलें. त्यासाठीं मडगांवापैकीं शोलेघ्री नांवाचें शेत २०० स खरेदी करून लावून दिलें आणि त्याच्या उत्पन्नांतून सरस्वतीमंदिरांत नेहमीं व्याख्यान अथवा पुराण चालावें असें ठरवून दिलें. तसेंच लेखक, आचार्य व वाग्देवी सरस्वती हिचा पूजक यांना तीन घरें बांधून दिलीं आणि यांपैकीं

जो हा करार मोडील त्यास राजानें ८०० चा दंड करावा अशी इच्छा प्रदर्शित केली. राजगुरु व कवि चक्रवर्ति पद्मेयभट्ट यानें हें शासन तयार केलें.

या तपशीलांत एकंदर १४ ठिकाणीं नाण्यांची संख्या दाखविणारे निर्देश आले आहेत. पण फक्त एके ठिकाणीं बृहत् भैरव गद्याण असा उल्लेख आहे. तेव्हां बाकीच्या जागीं कोणतीं नाणीं द्यावयाचीं हा प्रश्नच आहे. बृहद्भैरव गद्याणाच्या निर्देशावरून लघुभैरव गद्याण(=गद्याणक) आणि भैरवेतर गद्याण असे नाण्यांत आणखी दोन प्रकार होते असा संशय येतो. शिवाजीच्या तांब्याच्या नाण्यांवर 'राजा शिव' हे शब्द होते. त्या शब्दांवरून शिवाजीनंतरच्याही राज्यकर्त्यांनीं पाडलेल्या तांब्याच्या व उपर्युक्त शब्द असलेल्या नाण्यास शिवराया म्हणूं लागले. तद्वत् गद्याणावर असलेल्या भरव शब्दावरून भैरव गद्याण हा शब्द प्रचारांत आला असेल काय ?

**कालनिश्चयः**— प्रस्तुत ताम्रपटाचा लेखनकाल २१,२२ ओळींमध्यें शक १०२८, व्यय संवत्सर, फाल्गुन शुद्ध १३ गुरुवार असा दिला आहे. गणितदृष्ट्या तो बिनचूक असून गत शक १०२८ ला व्यय संवत्सर चालू होता व फाल्गुन शुद्ध त्रयोदशी गुरुवारीं ३७ घटकांनीं संपत असल्यामुळें त्या दिवशीं लेखांत वर्णिल्याप्रमाणें योग होता. त्या दिवसाची इंग्रजी तारीख ७ फेब्रुवारी ११०७ इसवी अशी येते.[1]

**स्थलनिश्चयः**—प्रस्तुत ताम्रपटांत कित्येक स्थलनामें व शेतांचीं नांवें उल्लेखिलीं आहेत. बहुतेक स्थलें सध्या गोव्याच्या प्रदेशांत आहेत असें दिसतें. येवढें निश्चित झाल्यावर जुने कागदपत्र शोधूं लागलों असतां श. १०२८ च्या या शासनांत आलेलीं शेतांचीं नांवें यानंतर सुमारें सहाशें वर्षांनीं लिहिलेल्या कागदांत जवळजवळ तशींच आलेलीं पाहून विस्मय वाटला.[2] आजही म्हणजे ९००।९२५ वर्षांनंतर तींच नांवें प्रचारांत असतील असें वाटतें. असो. मूळ स्थलनामें, त्यांचीं आजचीं रूपें, त्यांचीं नकाशांतील किंवा कागदांतील नांवें व गोवें प्रांतांतील इतिहासप्रसिद्ध फोंडें गांवापासून त्यांचीं दिशायुक्त अंतरें इत्यादि तपशील पुढें देत आहे.

---

१ पिल्ले, **इंडियन एफिमेरिज**, भाग ३, पृ. २२.

२ इतिहाससंग्रहापैकीं '**गोमंतकाच्या इतिहासाचीं साधनें**' प्रकरणांतील क्र.३५ हा लेख फोंडें महालाच्या मोगली अधिकाऱ्यांनीं मडकईचे गावकार व कुळकर्णी यांस लिहिला असून त्याची तारीख सुहूर १०९१ रमजान १५ (श. १६१२ ज्येष्ठ वद्य २, इ. १६९० जून १३ ) अशी आहे. क्र. ३६ हा मोगली परवाना असून तो अंतरूज तप्याच्या अधिकाऱ्यांना व रयतेला आला आहे. याची तारीख जुलूस ३४, सु. १०९१ रबिलाखर १५ ( श. १६१२ पौष वद्य २, इ. १६९१ जानेवारी ६ ) ही आहे. या दोन कागदांत मिळून मडकई येथील ब्रह्मपुरी नांवाचा भूभाग आणि गाळी, सातक, बेलोर, माजीखंड, होड खाजन, कजाळी व तींपैकीं तीन पाती अशीं ठिकाणें निर्दिष्ट आहेत. यापैकीं येथील ब्रह्मपुरी व प्रस्तुत ताम्रशासनांतील ब्रह्मपुरी एकच आहेत कीं नाहींत याविषयीं शंका आहे.

| | स्थलनाम | ताम्रपट्टांतील ओळ | हल्लींचें नांव | नकाशांतील नांव | इतर माहिती |
|---|---|---|---|---|---|
| १ | प:जणि(खली) | ३ | पणजी | Panjim | ......... |
| २ | गोपक –गोव(ग्राम व द्वीप) | ६, २२, २४ | गोवें(जुनें)व बेट | Goa Velha | ......... |
| ३ | ब्रह्मपुरी | ७ | ? | ? | ......... |
| ४ | किसूर | ८ | ? | ? | ......... |
| ५ | आम्ब्र(म्र)वण | १० | आमोणें | Amonle | फोंड्याचे उत्तरेस १० मैल |
| ६ | वेर | १० | वेरें | Verey | ,, ,, ६ मैल |
| ७ | पिरियल | १२ | प्रियोळ | Piriol | ,, ,, ३ मैल |
| ८ | सिरूर | १३ | ? | ? | ......... |
| ९ | कुलस्थाली | १४, २५ | कुट्ठाळ | Courtallim | फोंड्याचे पश्चिमेस ७ मैल |
| १० | कपिलक | १६ | कवळें | Keeola ( east or west ) | फोंड्याचे पश्चिमेस अनुक्रमें २ व ४ मैल |
| ११ | नेउर | २५ | नेवरें | Neura ( big or small ) | फोंड्याचे वायव्येस ८ मैल |
| १२ | पल | २६ | पालयें | Paliem | फोंड्याचे वायव्येस १६ मैल |
| (१२ अ) | असौली | २६ | ? | — | १२ मधील क्षेत्रांचीं नांवें; प्रकाशित कागदांत याचे उल्लेख आढळले नाहींत. |
| (१२आ) | चिंचखण्डी | २६ | ? | — | |
| १३ | अन्तुरज | २७ | अंत्रूज | — | हें महालाचें नांव जुन्या कागदपत्रांत असेंच सांपडतें; फोंडें महालाच्या आसपासचा भाग. |
| १४ | मडक | २७ | मडकई | Moorkye | फोंड्याच्या पश्चिमेस ५ मैल |

| स्थलनाम | ताम्रपटांतील ओळ | हल्लींचें नांव | नकाशांतील नांव | इतर माहिती |
|---|---|---|---|---|
| (१४अ) गाली | २७ | गाली | — | १४ मधील क्षेत्रांचीं नांवें; मागील विवेचन पहा. |
| (१४आ) शत्त(न्ती)क | २७ | सातक | — | ” |
| (१४इ) वेल्लोर | २८ | बेलोर | — | ” |
| (१४ई) मज्जिखण्ड | २८ | माजीखंड | — | ” |
| (१४उ) करःजाली | २८ | कर्जाली | — | ” |
| (१४ऊ) होडु खज्जणक | ३१ | होड खाजन | — | ” |
| १५ षट्षष्टि | ३२ | साष्टी | Salsette | गोव्यांतील एक प्रमुख विभाग |
| १६ कुडत्तरी | ३२ | कुडतोरी | Courtary | मडगांवाचे पूर्वेस पांच मैल व फोंड्याच्या दक्षिणेस ८ मैल |
| (१६अ) कोंढलक | ३२ | — | — | १६ मधील एका क्षेत्राचें नांव; प्रकाशित कागदांत याचा उल्लेख आढळला नाहीं. |
| १७ राइग्राम | ३३ | राय | Rye | फोंड्याच्या दक्षिणेस ६ मैल |
| (१७अ) पय्यावय्य(य) | ३३ | — | — | १७ मधील क्षेत्राचें नांव; प्रकाशित कागदांत याचा उल्लेख नाहीं. |
| १८ मठग्राम | ४६ | मडगांव | Margaon | फोंड्याचे दक्षिणेस ९ मैल |
| (१८अ) शोलेग्री | ४६ | — | — | १८ मधील क्षेत्राचें नांव; प्रकाशित कागदांत याचा उल्लेख आढळला नाहीं. |

## पाठ*

पहिला पत्रा, दुसरी बाजू

( १ ) ओं[1] स्वी: । श्रियः पतिः श्रिये भूयाद्भवतां भक्तिभावितः । व्र(ब्र)-
ह्मादि सुरसंदोहो यन्मनीषाविजृंभितं ॥ [ १ ॥* ] त्रिपुरं

( २ ) जयतः शंभोरभूद्वीररसात्पुमान् । त्रितो(लो)चनकदम्वा(म्बा)ख्यः
कदम्व(म्ब)तरुसंश्रयात् ॥ [ २ ॥* ] तदन्वयेभूत्प्र-

( ३ ) ख्यातः षष्ठराजो नृपाग्रणीः । ग्रामे पःजणिखल्याख्ये तद्भृत्यः
कालपोप्यभूत् ॥ [ ३ ॥* ] जज्ञे षष्ठ-

( ४ ) नृपात्ख्यातो जयकेसी(शी) जयैकभूः । तद्राज्यधुर्यो भृत्योभून्नागानः
कालपात्मजः ॥ [ ४ ॥* ] तस्मान्नृपात्रि(त्त्रि)-

( ५ ) भुवनमल्लो नामोक्तविक्रमः । तद्भृत्यो गण्डगोपाल(लः) केलिमो
नागणादभूत् ॥ [ ५ ॥* ] अनेकशोतिदु:]

( ६ ) साधान्रिपून्निर्जित्य संगरे । पत्युः प्रसादादकरोत्पूर्त्तान्धर्म्मांस्तु
गोपके ॥ [ ६ ॥* ] तडागं गण्ड-

( ७ ) गोपालदेवन्त[2](वं त)त्सेतुसंश्रितं । चक्रे व्र(ब्र)ह्मपुरीं रम्यहर्म्म्यां
प्राकारमण्डिताम् ॥ [ ७ ॥* ] ✳[3] ॥

( ८ ) ग्रामातिकसूरादण्णय्यभट्टोस्मात्पोम्मणार्यकः । सोमार्योस्मादथ-
र्व्वाणो मुख्यां:(ख्याः) शान्तिकपौष्टिके ॥ [ ८ ॥* ]

( ९ ) तच्छाखो माधवार्योस्मिन्नेवदास(सो) वु(बु)धस्ततः । तस्मा-
ज्जयन्तभट्टोभूद्राज्ञां पौराणिकास्त्वमी ॥ [ ९ ॥* ] ग्रा-

---

* ताम्रपटाचा हा पाठ फोटोवरून तयार केला आहे. मूळ ताम्रपटांत असलेलीं कांहीं अक्षरें व अनुस्वार फोटोमध्यें नीट उठलेलीं नाहींत असें वाटतें. तेव्हां अशा ठिकाणीं मूळ ताम्रपटांत शुद्ध रूपें आलीं आहेत असें गृहीत धरून तशीं रूपें देण्याचा प्रयत्न केला आहे.

१ चिन्हानें दाखविला आहे.

२ येथें व पुढें कांहीं ठिकाणीं कंसांत दाखविलेल्या परसवर्णविषयक सुधारणा व्याकरणनियमांप्रमाणें आवश्यक नाहींत. त्या अर्थविशदीकरणासाठीं दाखविल्या आहेत.

३ बहुधा एक मुद्दा संपल्याची विशिष्ट खूण.

( १० ) मादाम्र(म्र)वणात्साविणार्योस्मात्सा(च्छा)न्तदैववित् । तस्मान्म-
ण्यालदैवज्ञो राज्ञां सांवत्सरास्त्वमी ॥ [ १० ॥* ] वे-
( ११ ) रग्रामात्सोमभट्टस्तस्मान्म्हालय्यदीक्षितः । तस्माद्विवेदीश्वरार्यो
राज्ञान्ध(ज्ञां ध)र्म्माधिकारिणः ॥ [ ११ ॥* ] प-
( १२ ) रमेश्वरसंभूताद्भट्टनारायणादभूत् । केशवार्योथ सोमार्यो भूपानां
गुरवस्त्वमी ॥ [ १२ ॥* ] ग्रामात्पि-

दुसरा पत्रा, पहिली बाजू

( १३ ) [1]त्पिरियलादज्जमार्योस्मान्नागदेववित् । तस्माद्वामनभट्टोभूद्राज्ञां
वैद्याश्ववादिनः[2] ॥ [ १३॥* ] ग्रामात्सि-
( १४ ) रूरात्तिक्कय्यघैसासाद्वामनार्यकः । तस्मादज्जमभट्टोभूद्राज्ञामेते
पुरोहिताः ॥ [ १४॥* ] कुलत्था-
( १५ ) ल्यां म्हालपार्यस्तस्मान्नारायणार्यकः । तस्मान्म्हालय्यविद्राज्ञां
विद्यायां गुरवस्त्वमी ॥ [ १५॥* ] तत्रैव म्हा-
( १६ ) लपार्योम्यस्तस्माद्भट्टस्त्रिविक्रमः । तस्मान्नारायणार्योमी राज्ञान्ध
( ज्ञां ध )र्म्माधिकारिणः ॥ [ १६॥* ] ग्रामात्क-
( १७ ) पिलकाद्वासलार्याद्वातय्यवेदवित् । तस्मादज्जलघैसासो वेदेमी
पट्टवर्द्धनाः ॥ [ १७॥* ] तत्रैव सा(शा)न्तिभ-
( १८ ) ट्टोम्यस्तस्मात्पत्तय्यवेदवित् । तस्माद्गोविन्दक्रमविद्यज्वनां पट्टवर्द्धनाः
॥ [ १८॥* ] तत्रैव वेद-
( १९ ) द्वयविद्गोविन्दाद्विष्णुपण्डितः । तस्माद्गोविंदद्विवेदी याज्ञिकप्रवरा-
स्त्वमी ॥ [ १९॥* ] शांखो-
( २० ) भालंदनश्चैव भारद्वाजोथ कौशिकौ[3] । भरद्वाजोथ वत्सश्च शांडि-
ल्यौवत्सजाह्वयः[4] ॥ [ २०॥ ] कौशि-
( २१ ) कोत्रिरमून्येषां गोत्राणि द्वादश क्रमात् ॥ [ २१॥* ][5] शाके वर्षसह-
स्रेष्टाविंशत्या संयुते व्यये । वर्षे फाल्गु-

---

१ ' त्पि ' हें अक्षर गाळावें

२ ' वैद्या अश्ववादिनः ' असें असावें. वृत्तमुसार्थ वरील पाठ तयार केला.

३ ' कौशिकः ' चें ' कौशिकौ ' केलें आहे.

४ ' वत्सजाह्वयः ' असें वाचावें

५ विषयाच्या दृष्टीनें २१ वी कविता २ पादांची तर २४ वी ६ पादांची केली आहे.

( २२ ) नशुद्धायां त्रयोदश्यां गुरोर्द्दिने ॥ [२२॥*] गोपकस्थे(स्थे) त्रिभुवन -
मल्ले राज्यं प्रशाश(स)ति ॥ स्वामिकारापक-
( २३ ) इव केलिवर्म्मा तु द(ध)र्म्मधीः ॥ [ २३ ॥* ] पुरोहितमहा-
मात्यस्वामिभूपालसन्निधौ । नानादेशसमायात-
( २४ ) ब्रा(ब्रा)ह्मणान्सन्निधाप्य च ॥ पौरजानपदान्तनागरान्सन्निधाप्य
च । [।२४॥* ] गोवदीवाभिधे देशे ग्रामे रट्ठोड-

दुसरा पत्रा, दुसरी बाजू

( २५ ) नेउरे। पूगीवनं शताद्देवात्क्रीत्वा प्रादान्नमस्यकं ॥ [२५॥*] कुलत्था-
ह्युद्भवाम्मालपय्यात्सामन्तपुत्रकात् ॥
( २६ ) प(प)लग्रामे त्वसौलीति शतात्क्रीत्वा नमस्यकं ॥ [२६॥* ] तद्ग्रा-
मात्सोन्नार-धी[1] चिंचखण्डीति पालणं । शता-
( २७ ) त्क्रीत्वा ददौ सर्व्वमेतत्पाङ्गादिवर्ज्जितं ॥ [ २७ ॥* ] देशेन्तुरज-
संज्ञेन्यद्ग्रामान्मडकसंज्ञकात् । गालीशत्त(न्त ?)-
( २८ ) कवेल्लोरमज्झिखण्डादिसंज्ञकं ॥ [ २८ ॥* ] क्षेत्रं पञ्चशतैः क्रीत्वा
साघाटमकरं ददौ । क्रीता पत्तिः करः-
( २९ ) जाल्यां शताद्ग्रामान्नमस्यका ॥ [ २९ ॥* ] पत्तिः(त्तिः) पंचाशता
क्रीता पत्तय्यसुतनारणात् । पत्तय्यसुततिक्क-
( ३० ) य्यात्पात्तिः पंचाशतापरा ॥ [ ३० ॥* ] वृ(बृ)हद्भैरवगग्राणपंचकं
च शतात्ततः । एवं पात्तित्रयं प्रा-
( ३१ ) दात्साघाटं सनमस्यकं ॥ [ ३१ ॥* ] नन्नपय्यान्नमस्यं च होडुख-
उजणकं क्रयात् । क्रीतं नाग्येन त-
( ३२ ) स्मात्तत्क्रीत्वा प्रादाच्छ्रा(च्छ्र)तैस्त्रिभिः ॥ [३२ ॥* ] षट्षष्टिदेशग
द्ग्रामाकु(त्कु)डत्तय्याह्वयात्त्रिभिः । शतैः कौंढलकं क्री-
( ३३ ) त्वा साघाटमकरं ददौ ॥ [ ३३ ॥*] तद्देशादग्रामात्स पव्यावट्या
( द्या?) दिसंज्ञकं । क्षेत्रं सार्द्धशतात्क्रीत्वा साघाट-
( ३४ ) मकरं ददौ ॥ [ ३४ ॥* ] तद्गोत्रेभ्यो द्विजाग्रेभ्यो द्वादशभ्य :
क्रमादसौ । प्रक्षाल्य चरणद्वंद्वं धारापूर्व्वं क्रियायु-

---

१ हा शब्द नीट लागला नाही.

( ३५ ) तं ॥ [३५ ॥*] केलिवर्म्मा ददौ तानि क्षेत्रोद्यानगृहाणि च । तत्स-
न्तानोपभोगार्थं यावदाचंद्रतारकं ॥ [ ३६ ॥* ] सम-

( ३६ ) यश्च कृतस्तेन क्षेत्रगेहाश्रृ(श्रि)तस्तदा । फलं विभज्य भोक्तव्यं
क्षेत्वं(त्रं) साधारणं सदा ॥ [ ३७ ॥* ] साधारणत्वा-

तिसरा पत्रा, पहिली बाजू

( ३७ ) त्क्षेत्राणां गृहाणां दाम(न)विक्रयौ । कुर्व्वन्पंचशतं दंड्यो गृह्णन्के-
तापि दण्डभाक् ॥ [ ३८॥* ] भागगृहे वस-

( ३८ ) न्भु(न्भुं)वते त्यक्त्वा गच्छति यो गृहा(हं) । स्छि(स्थि)तास्तद्भागमश्नी
युदं(दं)ड्यो दु(उ)क्तांशयाचकः ॥ [३९॥* ] अस्वामिकगृहे

( ३९ ) सर्व्वैः स्थापितोभ्यागतो वसेत् । पार्श्वस्थगृहसम्मत्या शतन्दं(तं दं)
ड्योन्यथा वसन् । [ । ४०॥* ] गण्डगोपालदेव-

( ४० ) स्य परित्राणगतेः सद्दा(दा) । कार्यन्दे(र्यं दे)वधनेनापि व्याख्यानं
भारती गृहे । [ । ४१॥* ] लेखं(ख)काचार्यवाग्देवीपू-

( ४१ ) जकस्य गृहत्रयं । समयं लंघयन्नेनं राज्ञा दंडयोष्टकं शतं ॥ [४२॥*]
सामान्योयं धर्म्मे(र्म)सेतुर्नृपाणां का-

( ४२ ) ले काले पालनीयो भवाद्भिः । सर्व्वानेताम्भाविनः पार्थिवेंद्राम्भूयो
भूयो याचते

( ४३ ) रामचन्द्रः ॥ [४३॥* ] स्वदत्तां परदन्तां(त्तां) वा यो हरेत वसुन्(सुं)
[ध*]रां षष्ठिर्व्वर्षसहस्राणि विष्ठायां जा-

( ४४ ) यते कृमिः ॥ [ ४४॥* ] व(ब)हुभिर्व्वसुधा भुक्ता राजभिः सगरा-
दिभिः । यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य

( ४५ ) तदा फलं ॥ [ ४५ ॥* ] कृतं श्रीराजगुरुणा कवीनां चक्रवर्तिना ।
श्रीमत्पद्मयभट्टेन शास(स)नं ललिता-

( ४६ ) क्षरम ॥ [ ४६ ॥* ] ✳[1] शोलेग्रीति मठग्रामा[त्*] क्षेत्रं क्रीत्वा
ददावसौ [ ।* ] शतद्वयेन भार

( ४७ ) त्यै नमस्याघाटसंयुतं ॥ [ ४७ ॥* ] ✳[1]

---

१ बहुधा एक मुद्दा संपल्याची विशिष्ट खूण.

# [ ८ ] आंबे-जोगाई येथील उदयादित्याचा शिलालेख, शके १०६६.

( मो. गं दीक्षित )

निजाम हद्दींतील आंबे-जोगाई उर्फ मोमिनाबाद हें एक तालुक्याचें ठिकाण असून तेथें प्राचीन व ऐतिहासिक काळांतील अनेक अवशेष इतस्ततः विखुरलेले आढळून येतात. ह्या ठिकाणचें योगेश्वरी उर्फ जोगाई हें मोठें जागृत देवस्थान असून महाराष्ट्रांतील बहुतेक चित्पावन ब्राह्मणांचें तें कुलदैवत मानलें जातें. यादव राजवटींत ह्या स्थळाचें महत्त्व सिंघण राजाचा सेनापति खोलेश्वर ह्यानें विशेष वाढविलें. त्याचे खुद्द आंबें येथें चार शिलालेख सांपडले असून[1], तत्कालीन महानुभावीय वाङ्मयांत तें 'खोलेश्वराचे आंबे' ह्याच नांवानें ओळखलें जात असे[2]; येथें यादव कालांतील देवळें पुष्कळच असून त्याशिवाय गांवाचे उत्तरेस खडकांत खोदून काढलेलीं दोन ब्राह्मणी व एक जैन-पंथीयांचें अशीं एकंदर तीन कोरीव लेणीं आहेत.[3] हीं बहुतेक भग्नावस्थेंतच असून त्यांतील सध्यां बऱ्यापैकीं स्थितींत असलेलें एक लेणें, त्याच्या प्रांगणांत कोरलेल्या हत्तींच्या चार अवाढव्य प्रतिमांवरून "हत्तीखाना" किंवा जोगाईचें माहेर ह्या नांवानें ओळखलें जातें. १९४६ सालीं हैद्राबादच्या पुराण-वस्तु-संशोधन-खात्यामार्फत ह्या लेण्याची दुरुस्ती चालू असतां मातीच्या गाडल्या गेलेल्या ढिगाऱ्यांत येथें प्रसिद्ध केलेला शिलालेख नजरेस आला. गतवर्षी पुणें विद्यापीठामार्फत प्राचीन मराठी लेखाचे संशोधनार्थ प्राध्यापक डॉ. शं. गो. तुळपुळे व मी आंबे-जोगाईस गेलों असतां आम्ही ह्या शिलालेखांचे ठसे घेतले. श्री. तुळपुळे ह्यांचे संमतीनें त्याचें वाचन येथें प्रसिद्ध केलें आहे. आंबे-जोगाई येथील लेखांचे ठसे मिळविण्याचे कामीं आम्हांस तेथील सुप्रसिद्ध वकील व कार्यकर्ते श्री. राजाभाऊ चौसाळकर ह्यांची अत्यंत मदत झाली.

---

१ हे लेख श्री. ग. ह. खरे ह्यांनी ह्याच पुस्तकाचा पहिला खंड, पृ. ५५-७८ ह्यावर प्रसिद्ध केले आहेत.

२ पहा **लिळाचरित्र** ( संपा. ह. ना. नेने ), एकांक, पृ. ९ आणि उत्तरार्ध पृ. २५४.

३ ह्या लेण्यांचें सविस्तर वर्णन बर्जेसनें **आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया**, खण्ड ३ पृ. ५०-५१ वर प्रतिमापत्रें ३३-३४ ह्यांवर दिलें आहे. प्रस्तुत शिलालेख उपर्युक्त ग्रंथांतील प्रप ३३।१ मधील 'एफ्' ह्या संज्ञेनें निदर्शित केलेल्या लेण्यांतील कोठडीजवळ सांपडला.

प्रस्तुत शिलालेख ज्या दगडावर कोरला आहे ती लेखशिला ६॥ फूट × २। फूट ह्या आकाराची असून, तिच्यावर अग्रभागीं चंद्रसूर्यांचीं चित्रें कोरलेलीं आहेत. त्याखालच्या भागावर दगड मुद्दाम घासून गुळगुळीत करून त्यावर लेखाच्या १३ ओळी खोदलेल्या आहेत. बरींच वर्षे मातींत दबून राहिला असल्यामुळें त्यावरचें लिखाण दगड नुकताच कोरावा इतकें चांगल्या स्थितींत संरक्षिलें गेलें आहे.

लेखाची लिपी नागरी, दक्षिणी वळणाची, बाराव्या शतकांतील आहे. अक्षरांच्या वळणाविषयीं प्रामुख्यानें सांगण्यासारखें कांहीं नाहीं. लेखाची भाषा अर्ध-संस्कृत व मराठी अशी संमिश्र आहे. लेखाची मिति व राजाचें नांव दर्शविणारा भाग संस्कृतांत असून इतर तत्कालीन लेखांप्रमाणें बाकीचा भाग मराठींत आहे. लेखाचा शेवट शापाशीर्वादात्मक श्लोकांत होतो. या लेखाच्या लेखनपद्धतीविषयीं कित्येक नामांचीं उकारान्त रूपें लक्षांत ठेवण्याजोगीं आहेत; उदा० **संवतु** (ओळ १), **कामतु** (ओळ ५), **वज्रदण्डु** (ओळ १०). तथापि ह्याच काळांतील इतर मराठी लेखांतून येणारीं अशीच रूपें लक्ष्यांत घेतां, तत्कालीन भाषेंत असे उकारान्त प्रत्यय लावण्याची पद्धत अतिरूढ होती असेंच म्हटलें पाहिजे. मराठी भाषेंतील कोशदृष्ट्या महत्त्वाचे शब्द या लेखांत पुढीलप्रमाणें आले आहेत; **कामतु** (ओळ ५) **सालिवण** (ओळ ६) आणि **डो** (ओळ ९). ह्यापैकीं कामतु-मूळ शब्द कामत-हा प्राचीन मराठी लेखांतून अनेक वेळां आलेला दिसतो;[1] कामत ह्या शब्दाचा अर्थ सामान्यतः खडकाळ किंवा बरड जागेंत केलेली शेती असा कोंकणांत केला जातो. सालिवण-हल्लींचा मराठी शब्द साळवण-हा शब्द ज्या जागेंत तांदूळ किंवा भात पेरलें असेल त्या जागेस उद्देशून म्हणण्याची वहिवाट आहे. साळवणांत लावलेलें भाताचें "रोपें" पुष्कळ दाट पेरलेलें असतात व कालांतरानें ते उपटून काढून दुसरीकडे अंतराअंतरानें लावतात. कोंकणांत व देशावर भातशेती करणाऱ्यांच्या हा शब्द पुष्कळ परिचयाचा आहे व कांहीं प्राचीन लेखांतूनही तो यापूर्वीं आलेला आहे.[2] **डो** (ओळ ९) हें नारळाच्या करवंटीस पळीसारखा दांडा जोडून केलेलें तेल-तुपादि स्निग्ध पदार्थ मोजण्याचें एक माप आहे. महानुभावीय वाङ्मयांत हा शब्द अनुस्वारयुक्त

---

१ उदाहरणार्थ यादव सिंघण व निकुंभ गोवन याचा पाटण शिलालेख, शके ११२८ (ओळ २५). **एपिग्राफिया इंडिका,** भाग १, पृ. ३३८-३४६; तसेच आंबे शिलालेख नं. २; शक ११५० (ओळ ३९ व ४१), **द. म. इ. सा. खण्ड** १, पृ. ६५.

२ आंबे शिलालेख, नं. २ (ओळ ४१) **द. म. इ. सा;** खंड १, पृ. ६५; तेर येथील शिलालेख, शक १०८६. (ओळ ६). **द. म. इ. सा;** खण्ड २, पृ. ८२.

' डों ' असा लिहिलेला सांपडतो[3] व त्याचा अर्थ करवंटीची पळी असाहि शब्द कोशांत आढळतो. मराठी भाषेंतील जुन्या वाक्प्रचाराच्या दृष्टीनेंही ह्या लेखांतील एक प्रयोग ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. ह्यांत दान दिलेल्या जमिनीस उद्देशून एके ठिकाणीं " सालिवण दांडेआची निवर्त्तने ३ " ( ओळ ६ ) असें म्हटलें आहे. सालिवण उर्फ साळवण हा भात शेतीच्या जमिनींपैकीं एक प्रकार हें वर सांगितलेंच. त्या उलट ज्या शेतांत ज्वारीबाजरी इत्यादि धान्य ( जिराईत ) पिकविलें जातें त्या शेतजमिनीस दांडेआची म्हणजे धांडे ( Stem ) असलेली जमीन असा वेगळा फरक करून ती जमीन निर्दिष्ट केली आहे. खानदेशांत कांहीं ठिकाणीं " यंदा कांहीं बागाईत केली नाहीं फक्त धांडीच जमीन आहे" असें वाक्प्रचार अजून लोकांच्या बोलण्यांत येतात. त्यावरून जमिनीची प्रतवारी करण्याचा एक प्रकार प्रस्तुत लेखांत आला आहे असें अनुमान करतां येतें.

प्रस्तुत लेखाचा काल ( शक ) संवत् १०६६, रक्ताक्षी संवत्सर, आश्विन शुद्ध १ गुरुवार असा लेखाच्या प्रारंभींच दिला आहे. ह्या दिवशीची इंग्रजी तारीख ३१ ऑगष्ट ११४४ इसवी अशी येत असून त्या दिवशीं लेखांत वर्णिल्याप्रमाणें गुरुवार होता. मात्र येथें येवढें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं वर सांगितलेला शक गत नसून, चालू आहे.[4]

हा शिलालेख उदयादित्य नांवाच्या अंबा येथें रहाणाऱ्या महामंडलेश्वरानें वर सांगितलेल्या दिवशीं जीं दानें दिलीं तीं निदर्शित करण्यासाठीं खोदला आहे. ह्यांत उदयादित्यास रत्नदेवाचा शिष्य व भूचरनाथ ह्या दैवताच्या पादपद्मांतील भ्रमर ( म्हणजे सेवा करणारा ) अशीं विशेषणें लावलीं असून दान वरील दैवतासाठीं दिलें आहे. त्यांत सेलू ह्या गांवांत २० ग० (गव्युति)[5] कामाख्य नांवाची १२ ग० जमीन, राडी ह्या गांवांत साळवण व दांडे यांनीं युक्त अशीं तीन निवर्त्तनें जमीन, त्याच प्रमाणें सिंघणदेव ह्या गृहस्थास जवळगांव ह्या गांवीं कांहीं जमीन, तसेच नाथाची ( भूचरनाथाची ) पूजा करणाऱ्यास बारा गद्याण, कुंभेपल ( ह्या गांवांत ) ५ ग० जमीन, त्याच प्रमाणें ३५ बैल, प्रत्येक घाण्यामागें एक एक डो ( पळी ) भरून तेल, बाजारांत येणाऱ्या प्रत्येक दुकानावर १ कवडा ह्याप्रमाणें कर, फुलांसाठीं एक एक सर म्हणजे

---

३ उदाहरणार्थ खालील महानुभावीय वाङ्मय पहा. **ऋद्धिपूर–वर्णन** ( संपा. य. खु. देशपांडे ); पृ. १२२; **लिळा–चरित्र**, ( संपादक ह. ना. नेने ), पूर्वार्ध खण्ड ३, पृ. ४१.

४ पिळे, **इंडियन एफिमेरीज**, भाग ३, पृ. २९१

५ मूळ लेखांत ' ग ' असा संक्षेपच सर्वत्र आला आहे; तो बहुधा गव्यूति या साठीं अभिप्रेत आहे असें दिसतें. इतरत्र ग = गद्याणं असा अर्थ घ्यावयाचा आहे.

हार[६] व एक मळा ह्याप्रमाणें दान दिल्याचें नमूद केलें आहे. लेखाचे शेवटीं हें दान जो कोणी फेडील किंवा नाश करेल त्यावर योगिनींचा वज्रदंड पडेल अशी शपथ घातली आहे. यानंतर नेहमींप्रमाणें शापाशीर्वादात्मक श्लोक आलेले आहेत.

ह्या ठिकाणीं बहुवचनानें उल्लेखिलेल्या योगिनी एकतर चौसष्ट योगिनी तरी असाव्यात किंवा ज्या योगिनींच्या लेण्यांत ( जोगिनींचें माहेरघर ) हा लेख सांपडला त्या देवतेस आदरार्थी उद्देशून असावा; असें असलें तर प्रस्तुत लेखांवरून आंबे जोगाई येथील जोगाईच्या प्राचीनत्वाची एक निशाणी आपणांस येथें मिळाली असें म्हणतां येईल.

प्रस्तुत शिलालेख हा आंबें ह्या गांवीं सांपडलेल्या सर्व लेखांतील अत्यंत जुना लेख आहे. ह्यांत उल्लेखिलेला उदयादित्य हा कोण होता किंवा कोणाचा महामंडलेश्वर होता हें लेखांत त्याच्या कुळाचा किंवा दुसऱ्या कोणत्याही बाबींचा उल्लेख केला नसल्यामुळें सांगतां येणें कठीण आहे. खुद्द आंबे किंवा त्याच्या परिसरांत फारसे जुने किंवा तत्कालीन लेख सांपडले नसल्यामुळें हा प्रदेश नेमका कोणाच्या ताब्यांत होता हें सांगतां येत नाहीं. तथापि ह्या लेखाच्या कालाचा विचार करतां बहुधा तो सेऊण किंवा यादवांच्या पहिल्या घराण्यांच्या अमदानींत कोरला गेला व उदयादित्य हा त्यांचा मांडलिक असावा असें दिसतें. पण प्रस्तुत लेखांतील उल्लेख अगदींच मोघम असल्यानें निश्चयात्मक मात्र असें कांहीं सांगतां येत नाहीं.

ह्या लेखांत पुढीलप्रमाणें **ग्रामनामें** आलीं आहेत. **अंबा** ( ओळ १ ), **सेलुग्राम** ( ओळ ५ ), **राडी** (ओळ ६), **जवलग्राम** (ओळ ७) आणि **कुंभेपल** (ओळ ८). हीं सर्व गांवें आंब्याच्या परिसरांतीलच आहेत. अंबा हं अर्थात हल्लींच्या आंबेजोगाई उर्फ मोमिनाबाद ह्या गांवास उद्देशून आहे हें स्पष्टच आहे. सेलू-ग्राम हें हल्लीं सेलू ह्या नांवानें ओळखलें जात असून तें आंब्याच्या आग्नेयीस दक्षिणेकडे ५ मैलावर आहे. राडी ह्या गांवाच्या नांवांत कांहीं फरक झालेला नसून त्याच नांवानें तें सेलूच्या दक्षिणेस २ मैलावर वसलेलें आहे. जवलग्राम–जवळगांव ह्या स्वरूपांत आंब्यापासून ६॥ मैलावर आग्नेयीस आहे. ह्याच गांवाचा उल्लेख पूर्वीं आंबे–शिलालेख नं. २ ह्यांत आलेला आहे[७]. कुंभेपल,

---

६ फुल(ला)सर हा शब्द जरी हल्लीं फारसा प्रचारांत नसला तरी प्राचीन मराठी वाङ्मयांत तो आढळतो. उदा०

**फुला फुलसरा लेख चढे । द्रुती दुजी अंगुळी न पडे ।**
**श्लोक अध्याय तेणे पाडे । जाणावे हे ॥**

**ज्ञानेश्वरी**, अध्याय, १८।५७

७ **द. म. इ. सा.**, खंड १, पृ. ६५; चालुक्य विनयादित्याच्या बोरगांव ताम्रपटांतही हें गांव उल्लेखिलेलें आहे. **द. म. इ. सा.**, खण्ड २. पृ. २५

हल्लींचें कुंभेफळ, हें आंब्यापासून ४॥ मैलावर आग्नेयीस पश्चिमेकडे, व राडीच्या पश्चिमेस ३ मैलावर वसलेलें नकाशांत दिसतें. हीं सर्व गांवें हैदराबाद संस्थानच्या उस्मानाबाद जिल्ह्याच्या ५६ वी ह्या सर्व्हे–शीट मधून शोधलेलीं आहेत.

## पाठ[1]

( १ ) ओं[2] ॥ स्वस्ति संवतु १०६६ रक्ताक्षी संवत्सरांतर्गत अश्विन

( २ ) शुद्ध १ गुरुदिने अद्येह श्रीभूचरनाथपादपंकजभ्रम-

( ३ ) र श्रीरत्नदेवः गुरुश्चरणाराधनतत्परः अंबा समाधिष्ठि-

( ४ ) त महामंडलेश्वर उद[3]यादित्यदेवेन परमभक्त्या ना-

( ५ ) थां कामतु सेलुग्रामीं ग २० [ ।* ] तथा कामा[4]ख्ये भूमि ग[5] १२ [ ।* ]

( ६ ) राडिए सालिवण दांडेआचीं निवर्त्तनें ३ [ ।* ] सिंघणदेवां

( ७ ) जवलग्रामीं भुमि दत्त [ ।* ] नाथपूजितेआ पुजारेआ ग १२ [ ।* ]

( ८ ) कुंभेपलीं भूमि ग ५ [ ।* ] तलिं माग्य बैल ३५ [ ।* ] घाणेआ प्रति

( ९ ) तेला डो १ [ ।* ] हाटं प्रति कवडा १ [ ।* ] फूलासरी १ [ ।* ] मला १ [ ।* ] जो फेडीं

( १० ) लोपी तेआ योगिनींचा वज्रदंडु पडे ॥ वहुभिर्व्वसुधा भुक्ता

( ११ ) राजभिः सगरादिभिः । यस्य यस्य यदा भूमिः तस्य तस्य

( १२ ) तदा फलम(म्)॥ स्वदत्तां परदत्तां वा यो हरेतु(त) वसु(सुं)-धरा(रां) । षष्टिं वर्ष-

( १३ ) सहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥ इति शुभं ॥

---

१ मूळ दगडावरून व ठशांच्या सहाय्यानें

२ चिन्हानें दर्शविला आहे

३ 'उद' शब्दानंतर तीच अक्षरें चुकीनें पुनः कोरलीं गेलीं होतीं, ती चूक लक्ष्यांत घेऊन खोडलेलीं अस्पष्ट दिसतात.

४ दगडांतील दोषामुळें हें अक्षर ठशांत 'शा' सारखें दिसतें.

५ हें अक्षर 'म' असेंहीं वाचतां येतें; परन्तु येथें 'ग' हेंच वाचन युक्त आहे.

# [ १ ] शिलाहार हरपालदेव ह्याचा रांजली शिलालेख; शक १०७०

( मो. गं. दीक्षित )

**उपलब्धिः**–प्रस्तुत लेख कोरलेली शिला बी. बी. सी. आय रेल्वेच्या अधिकाऱ्यांस बऱ्याच वर्षांपूर्वी नाला–सोपारा ह्या स्टेशनाजवळ एका शेतांत सांपडली. तिचें संरक्षण करण्याच्या हेतूनें त्यांनीं ती मोठ्या तत्परतेनें तेथून हलवून मुंबईंस महालक्ष्मी–जवळ रेल्वेच्या कंट्रोलर ऑफ स्टोअर्सच्या कचेरीच्या आवारांत आणून ठेवली. शिलाहार–कालीन लेखांची जमवाजमव करीत असतां दीड वर्षापूर्वी श्री. तु. ज. बिर्जे सावंत ह्यांनीं मला ह्या लेखाबद्दलची माहिती सांगितली. त्यावेळीं घेतलेल्या छापावरून मी तिच्यावरील लेखाचें येथें संपादन करीत आहे.

**वर्णनः**–ह्या शिलेची लांबी–रुंदी १॥ फूट × १० इंच अशी असून तिच्या माथ्यावर मध्यभागीं कलश व बाजूस चंद्रसूर्य कोरलेले आहेत. त्या खालीं १४ ओळींचा लेख असून नंतर सुमारें १० इंच चौरस येवढी जागा गद्धेगाळाच्या चित्रानें व्यापलेली आहे. लेखाचा डावीकडचा सुमारें अर्धा इंच भाग सोडून बाकीचें लिखाण साधारण बऱ्यापैकीं शाबूत राहिलेलें आहे. तथापि लेख फार काळजीपूर्वक कोरला नसल्यानें पुष्कळ ठिकाणीं अक्षरांचें वळण चांगलें नाहीं व त्यामुळें लेख वाचण्यास अडचण पडते.

**भाषा व लिपिः**– हा लेख अर्ध–संस्कृत अर्ध–मराठी असा संमिश्र आहे; लिपि नागरी असून भाषा बरीच अशुद्ध आहे. ‘ श ’ बद्दल ‘ स ’ “ ख ” साठीं “ ष ” उपयोजिलेला आढळतो. तसेच ‘ नायकसाठीं ‘ नाएक ’, आणि आरामु, धर्मु वगैरे उकारान्त नामें तत्कालीन इतर लेखास अनुसरून आहेत.

**कालः**—ह्या लेखाचा काल दुसऱ्या व तिसऱ्या ओळींत “ सकनृपकालातित संवछरे दशस[त]ने” असा दिला असून संवत्सरनाम किंवा तिथि वगैरे कोणतीच दिलेली नाहीं शक १०७० शीं जुळणारा इंग्रजी सन ११४८–४९ असून इतर तपशील नसल्यामुळें कालाचा पडताळा पहातां येत नाहीं. ह्याशिवाय लेखाचे शेवटीं “ सकु संवतु १०५९ पिंगल संवत्सरे ” असा मजकूर पुन्हां आला आहे. ह्या कालाचा मूळ लेखाशीं कांहींच संबंध नसून त्याचा अन्वय ओळ १३ मधील उत्तरार्धाशीं लावावयाचा आहे. परंतु तेथील वाक्यरचना नीटशी स्पष्ट नाहीं.

**सार व चर्चा**—ह्या लेखांत वर सांगितलेल्या वर्षी हरपालदेवाच्या राज्यांत सुर्पारक द्विसहस्र ( ह्या विभागाच्या ) सीमेंत अंतर्भूत होणारी ( कांहीं जमीन ) श्रीदिवल नायक प्रमुख असतांना हस्तोदकपूर्वक दान दिल्याचा उल्लेख आहे. तसेंच रांजली या

गांवांतील एक बाग ( आरामु ) श्री माहर गांवांतून आलेल्या, सुपारक येथील सहवासी ब्राह्मण विष्णु उपाध्या यास शासनपूर्वक दान दिल्याचें सांगितलें आहे. याशिवाय वृत्तिनिमित्त १० द्र[म्म] चाटंस विसलदेव यांनीं १०५९ पिंगल संवत्सरांत दिले. परंतु हा भाग चांगला लागला नाहीं.

प्रस्तुत शिलालेखांत हरपालदेव कोणत्या घराण्यांतील हें स्पष्ट दिलें नसलें तरी हरपालदेवाचे, ठाणें व सोपाऱ्याच्या आसपास ह्याच काळांतले पांच लेख ज्ञात झाले असल्यामुळें येथें उल्लेखिलेला हरपालदेव हा ठाण्याच्या शिलाहार राजवंशांतील हें निर्विवाद आहे. प्रस्तुत लेख हा हरपालाचा सहावा व सर्वांत जुना लेख होय.

हरपालाचे हे लेख फक्त पुढें दिल्यापैकीं क्रमांक २ चा सोडून बाकीचे सर्व अप्रसिद्ध असल्यामुळें त्यांच्याविषयीं थोडीशी माहिती येथें देणें अप्रशस्त होणार नाहीं. हे लेख पुढीलप्रमाणें :—

( १ ) सोपारा शिलालेख, शके १०७१

( २ ) आगाशी शिलालेख, शके १०७२

( ३ ) बोरिवली शिलालेख, शके १०७५

( ४ ) ब्रिटिश म्युझियम शिलालेख, शके १०७६

( ५ ) करंजगांव येथील शिलालेख, काल अनिर्णित.

यापैकीं क्रमांक एकचा लेख सोपाऱ्यास जयराम भास्कर सोनार ह्याचे घराचे बांधकामांत घातलेला आहे येवढीच माहिती **मुंबई गॅझेटीयर**, खण्ड १, भाग २, पृ. १९, पादटीप ३ यावर दिली आहे.

क्रमांक दोनचा लेख, सोपाऱ्याजवळ आगाशी येथें सांपडला; त्याचे संपादन मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममधील मूळ शिलेवरून डॉ. सांकळीया व श्री. (आतां डॉ.) उपाध्याय ह्यांनीं **एपिग्राफिया इंडिका**, भाग २३, पृ. २७३ वर केलें आहे.

क्रमांक तीन हा बोरिवली स्टेशनच्या आग्नेयीस १०० यार्डांवर सिमलजवळ एका शेतांत पडला असल्याची माहिती **बॉम्बे गॅझेटीयर**, भाग १४ पृ. ३८८ यावर दिली आहे. त्यांत शक १०७५ श्रीमुख संवत्सर, हरिपाल हें राजाचें नांव व हरिपालेश्वर हें देवालयाचें नांव आलेलें आहे येवढीच माहिती फक्त उपलब्ध आहे. हा शिलालेख सध्यां कोठें आहे त्याचा पत्ता नाहीं. व बोरिवलीहून ब्रिटिश म्युझियममध्यें गेलेला शिलालेख तो हा नव्हे. मुंबईसही प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्यें हा विद्यमान नाहीं.

क्रमांक चारचा लेख बोरिवलीसच सांपडला होता. व तो सध्यां ब्रिटिश म्युझियममध्यें आहे. वर क्र. ३ प्रमाणें यांतही नऊच ओळी आहेत. परंतु तो एक वर्षानंतर भागा-

हून कोरलेला आहे. यांत पहिल्याच ओळींत 'शकु १०७६ भाव संवत्सरे, माघ शुद्ध पौर्णिमास्यांयां पर्व्वणि' व चवथ्या ओळींत 'हरपालदेवु' असें नांव आलें असल्याचें डॉ. कीलहॉर्न ह्यांनी ब्रिटीश म्युझियममधील छापाचे वाचन करून नमूद केलें आहे. (डॉ. कीलहॉर्न यांची **दाक्षिणेंतील उत्कीर्ण लेखांची याद्दी**, क्र. ३१० ). परंतु ब्रिटिश म्युझियममध्यें युद्धकालांत लेखांचे स्थलांतर करावें लागलें त्यांत हा लेख कोठे ठेवला गेला याची तेथील अधिकाऱ्यांना ओळख नाही. याचे ठसे मिळवावे म्हणून मी ब्रिटीश म्युझियमकडे फार चौकशी केली परंतु तो अजून उपलब्ध झाला नाहीं.

पांचवा लेख वसईजवळ करजोण ह्या गांवीं सांपडला होता, जो ठाण्याच्या कलेक्टर कचेरींत जमा केलेल्या शिलालेखांत बरीच वर्षे पडून होता. हे सर्व लेख आतां मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्यें संग्रहित केले गेले आहेत. तथापि ह्या लेखाचा दगड फारच धुपून गेल्यामुळें त्यांतून फारशी माहिती उपलब्ध होत नाहीं.

ह्याप्रमाणें पांच लेख ज्ञात असूनही शिलाहार हरपाल ह्याविषयीं फारशी माहिती ह्या लेखांतून उपलब्ध होत नाहीं, क्रमांक तीन मधील हरपालेश्वर देवालयाचा उल्लेख मात्र शके ११७१ मध्यें कोरलेल्या शिलाहार सोमेश्वराच्या एका अप्रसिद्ध शिलालेखांत आला आहे. (किलहॉर्न यादींतील क्रमांक ३१४) त्यावरून हें देऊळ सुमारें १०६ वर्षे तरी अस्तित्वांत होतें यांत शंका नाहीं.

प्रस्तुत लेख अगदीं नव्यानेंच उपलब्ध झाल्यामुळें त्यांतील सर्व माहिती अर्थात् नवीनच आहे. या लेखांत सुर्पारक द्विसहस्र, म्हणजे सोपाऱ्याभोंवतालचीं दोन हजार गांवें, किंवा २००० उत्पन्न येणारीं गांवें, असें प्रादेशिक नांव आलें आहे; एका प्रादेशिक गटांतले प्रमुख म्हणून हें प्राचीन बंदर येथें पहिल्यानेंच उल्लेखिलें जात आहे. दान दिलेला विष्णु उपाध्या हा गृहस्थ माहर ह्या गांवाहून येऊन सुपारक येथें राहणारा व रुहवासि ब्राह्मण होता असें सांगितलें आहे. सहवासि ब्राह्मणांचे उल्लेख शिलाहार घराण्याच्या कोल्हापूर शाखेच्या लेखांत एकदोन वेळां येतात[1]. परंतु ठाणें शाखेच्या लेखांत हा येथें प्रथमच येत आहे.

**स्थल निश्चयः**–ह्या लेखांत पुढील ग्रामनामें आलीं आहेत. **सुपारक** (ओळ ६ व १०), **रांजली** (ओळ ९ व ११) **माहर** (ओळ १०); ह्यांपैकीं सुपारक म्हणजे हल्लींचें सोपारा प्रसिद्धच आहे. रांजली हें गांव हल्लीं त्याच नांवानें सोपाऱ्याचे आग्नेयीस ४ चार मैलावर आहे. माहर हें गांव निर्मळ क्षेत्रापासून नैर्ऋत्येस १ मैलावर, व सोपाऱ्यापासून ७ मैलावर त्याच दिशेनें समुद्र किनाऱ्यावर वसलेलें माहर हें गांव होय.

---

१ **महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख**, पृ. ७६

## पाठ[1]

( १ ) ओं [।*] स्वास्ति जयश्चाभ्युदयश्च[2] [।*]
( २ ) सकनृपकालाति(ती)त संवछ(त्स)-
( ३ ) [रे]दशास[म]ते १०७० इह समस्त रा-
( ४ ) [जा]वली समलंकृत महामंडलेस्व(श्व)रा[धि]-
( ५ ) पति श्रीमत् हरिपालदेव राज्यका-
( ६ ) लविजयराज्ये श्री सुर्पारकद्विसह[स्रां]-
( ७ ) [त]स्थित सामान्य सागर काटीअ पर्यंत
( ८ ) + कीअ श्रीदिवल नाए(य)क प्रमुष(ख) समस्त ह[स्तो] -
( ९ ) [द]क सहिता भुवं रांजलीचा आरामु
( १० ) सा(शा)शा(स)न प्रदत्त [ ।* ] स्री(श्री)माहरविनर्गत सुपा-
( ११ ) रक [स]हवासि विष्णु उपाध्या रांजली[चा]-
( १२ ) पुरानै धर्मु उती(त)गीर्ण्णाति[3] साखु[4] तथा
( १३ ) व्रित्यआ निमित(त्य) द्र १० चाटंस[5] विसलदेतु
( १४ ) सकु संव्रतु १०५९ पिंगल संवस्त(त्स)रे

---

१ मूळ दगडावरून

२ शिलाहारांच्या कित्येक उत्कीर्ण लेखांचा प्रारंभ ह्याच वाक्यानें झालेला आढळतो. त्यामुळें प्रस्तुत लेखहीं त्याच घराण्यांचा ह्या विधानास पुष्टी मिळते.

३ बहुधा हा शब्द ' उत्कीर्ण करोति ' ह्या साठीं असावा.

४ कदाचित् हा शब्द ' साक्ष ' ह्यासाठीं येथें अभिप्रेत असेल असें वाटतें.

५ येथें ' चाटंस ' ह्या अक्षराबद्दल कोंठलीच शंका नाहीं. परंतु अर्थ नीटसा ध्यानांत येत नाहीं.

# [ १० ] वाफळे येथील यादवकालीन शिलालेख

( मो. गं. दीक्षित )

**उपलब्धि:**– प्रस्तुत शिलालेख सोलापूर जिल्ह्यांतील माढें ह्या तालुक्याच्या गांवापासून आग्नेय दिशेस ११ मैलावरील मौजे वाफळे ह्या गांवीं, गांवालगतच्या एका जुन्या मंदिरांत दक्षिणेच्या भिंतीस टेकून ठेवलेला आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी हा लेख कोरलेली शिला देवळाच्या परिसरांतच खणतां खणतां सांपडली होती. सोलापूर जिल्ह्याच्या गॅझेटीयर[1] मध्यें ह्या गांवीं एक नागरी शिलालेख आहे येवढीच माहिती दिली आहे. त्या उल्लेखावरून प्रस्तुत लेखाचे ठसे मी आणले व त्यावरून त्याचें संपादन येथें करीत आहे.

**वर्णन:**– प्रस्तुत लेखशिला सुमारें ५ फूट उंच व दीड फट रुंदीची असून, तिचा वरचा भाग निमुळता ठेवून त्यांत चंद्र सूर्य व कांहीं भक्तजन ह्यांचीं चित्रें काढलेलीं आहेत; त्या खालीं लेखाच्या ४१ ओळी खोदलेल्या असून त्या बऱ्याच सुस्थितींत आहेत. लेखाचा सुमारें ११ ओळी पर्यंतचा पूर्वार्ध लोकांनीं दगड फेकून मारल्यामुळें अतिशय खराब झालेला आहे. तथापि प्रयासानें त्यातील कांहीं अक्षरें साधारण वाचतां येतात.

**अक्षरवाटिका:**– लेख नागरी लिपींत लिहिलेला असून त्याचें वळण इ. सनाच्या बाराव्या शतकांतील अक्षरवटिकेशीं जुळतें आहे. त्यांच्या स्वरूपाविषयीं फारसें सांगण्याजोगें कांहीं नाहीं तथापि इ, क्ष, भ इत्यादि अक्षरांचीं रूपें जुन्या वळणावर आहेत.

**भाषा व लेखन पद्धति:**–लेखाची भाषा संस्कृत गद्यपद्यमय आहे. ओळ १ ते २२ हा प्रशस्तिचा भाग पद्यांत असून नंतरचा ओळ २२–३४ हा दानविषयक भाग गद्यांत आहे. ह्यानंतर पुढें ३५ ते ४१ ह्या ओळींत शापाशिर्वादात्मक श्लोक आलेले आहेत.

लेखाची भाषा संस्कृत असली तरी संधि-नियमांकडे दुर्लक्ष केल्यामुळें व लेखन-प्रमादामुळें सदोष आहे. कित्येक ठिकाणीं ती उच्चारानुसारिणी आहे. उदा० ओळ २७ मध्यें पूजयिता हा शब्द '**पूजइता**' असा लिहिला आहे, तर ओळ ३२ व ३४ मध्यें 'वृत्ति' हा शब्द '**व्रित्ति**' अशा स्वरूपांत आढळतो. तसेच कृमि शब्दा ऐवजी '**क्रिमि**' असें ओळ ४० मध्यें कोरलेलें आहे 'गृहित्वा' बद्दल '**ग्रिहित्त्वा**' (ओळ २६) व 'भूमी' बद्दल '**भूवे**' (ओळ २६) असेंहि इतर प्रमाद आढळतात.

वृत्तींची संख्या सांगतांना ती बहुशः आंकड्यांत व अक्षरीं अशा दोन्ही तऱ्हेनें

---

१ **बॉम्बे गॅझेटीयर,** भाग २०, पृ. ५०४.

सांगितलेली आढळते. लेखांत ३२ व्या ओळीनंतर एक आडवी रेघ काढलेली आहे ती बहुश: लेख कोरावयास घेण्यापूर्वी शापाशीर्वादात्मक श्लोकांसाठीं लागणारी जागा आखून घेण्यासाठीं काढलेली असावी. कोरणाऱ्याच्या अजमासाप्रमाणें प्रशस्ति व दानविषयक मजकूर ह्या रेघेपर्यंत संपूर्ण व्हावा असें होतें. परंतु प्रत्यक्षांत ३२ व्या ओळींपुढे दोन ओळी झाल्यावर शापाशीर्वादात्मक श्लोक सुरू होतात, त्यामुळें त्याचा हा अंदाज चुकला असें समजावयास हरकत नाहीं. एरवीं लेखाच्या अधेमधेच दोन लेख भिन्न असावेत असे वाटण्याजोगी आडवी रेघ काढण्याचें प्रयोजन काय तें समजण्यासारखें नाहीं.

**कालनिर्देशः**—प्रस्तुत लेखांत कालाचा स्पष्ट उल्लेख कोठेंच केलेला नाहीं. तथापि त्यांत यादव-वंशाची सिंघण (इ. स. १२१०=१२४७) ह्या राजापर्यंतची वंशावळ आलेली आहे. व दान देणाऱ्याचा प्रपितामह सिंघणाचा सेवक होता असें सांगितलें आहे. त्यावरून दर पिढीस वीस वर्षें ह्या हिशेबानें प्रस्तुत लेखाचा काल सिंघणानंतर ६०-८० वर्षें म्हणजे सुमारें १२९० इसवी असा ठरतो. अर्थात् ह्या अदमास १५-२० वर्षें पुढें मागें होण्याचाही संभव आहे.

**सार व चर्चा**—प्रस्तुत लेखाची सुरवात शिवाच्या नमनानें होते. त्यानंतर विष्णूच्या स्तुतीचा ताम्रपट-शिलालेखांतून नेहमीं आढळणारा 'नमस्तुंग' हा श्लोक आहे. त्यानंतर ओळ २ ते १४ मध्यें यादव राजवंशाची माहिती आली आहे. दुर्दैवानें राजप्रशस्तिचा हा भाग इतका खराब झालेला आहे कीं त्यांतून पुष्कळ परिश्रम करूनहि सर्व श्लोक समजण्याजोगा कोणताच अर्थबोध होऊं शकत नाहीं. परंतु येवढें मात्र निश्चित कीं ह्या प्रशस्तींत मल्लि किंवा मालुगि (ओळ ६), अमरगांगेय (ओळ ७), वल्लाळ (ओळ ७-८), भिल्लम (ओळ ९) जैत्रपाल (ओळ ९) सिंघ किंवा सिंघण (अनुक्रमें ओळ १२ व १५) अशीं राजपुरुषांचीं नांवें आलेलीं आहेत. यादव कुलाचें नांव स्पष्ट दिलेलें आढळून येत नसलें तरी वरील नांवें वर सांगितलेल्या क्रमानें ह्याच राजवंशांत आढळत असल्यामुळें हा लेख यादव राजवटींतील आहे हें अगदीं उघड आहे. प्रशस्तिचा मजकूर खंडित झाल्यामुळें आपण ह्या राजवंशाच्या कांहीं माहितीस मुकलों हें खरें असलें तरी वाचतां येण्यासारख्या स्थितींतील अक्षरांच्या वाचनावरून ही माहिती बहुशः सामान्य स्तुति व वर्णनपर असावी असें दिसतें. मल्लि (उर्फ मालुगि) ह्याचें दुसरें नांव श्रीकांत (?) होतें ही माहिती आपणास येथें प्रथमच समजते. तसेच सिंघण राजास आपल्या कारकीर्दींत पुष्कळशा वैऱ्यांशीं युद्ध करावें लागलें हीही माहिती नवीनच आहे. प्रशस्तिचा मजकूर संपल्यावर ओळ १५ ते २२ ह्यांमध्ये दान देणारा नारण (नारायण ह्याचें भ्रष्ट रूप) ह्याची वंशावळ आली आहे. तेथें असें सांगितलें आहे कीं, सिंघणाची सेवा करण्यांत तत्पर असा विश्वनाथ ह्या नांवाचा ब्राह्मण होता. त्याच्यापासून नारण, हा धर्मकृत्यांत फार प्रवीण असा होऊन गेला; त्याचें गोत्र कौशिक असून तो

वेदशास्त्रसंपन्न होता. त्याला हरिहर नांवाचा मुलगा होता. त्याचा मुलगा नारण प्रस्तुत लेखाचा दाता हा होय. ह्यानें तेजेश्वर आदि करून देवस्थानांसाठीं जी दान–योजना केली ती पुढें सांगितली आहे.

( १ ) तेजेश्वराच्या देवालयासाठी उपल गांवांतील ८० वृत्तींची जमीन, चार घरें, तीन पुष्पवाटिका, एक घाणा ( घाण्याचें उत्पन्न ) दिलेल्या जमीनीवरील कोटि–शुल्कादि करामधून फक्त अर्धा निष्क नाममात्र घेऊन बाकी कोणताही कर न घेतां ही सर्व जमीन दिलेली आहे. तसेंच देइंवडी ह्या गांवांतील पंधरा वृत्ति जमीन, त्यावरील उर्वरणासाठीं फक्त एक गद्याण घेऊन बाकीची सर्व बाधा विरहित अशी दिलेली आहे.

तसेंच बागवी ह्या गांवांतील तेजेश्वराची माईदेव ह्यानें पूजा करून देवळा-तील नऊ कलाकारांना प्रत्येकी चार ह्या प्रमाणें एकंदर ३६ वृत्ति जमीन दान दिली. वृत्ति घेणाऱ्यांचीं नांवें.

१ शंख–पूरक ( शंख वाजविणारा )

२ दोन काहलिक ( काहल हे दुंदुभीसारखें वाद्य वाजविणारे दोन इसम )

२ दोन मृंदग वाजविणारे

१ दुंदुभी – वादक

२ दोन जयघंटा वाजविणारे

१ चंडाईल ( चण्ड हें तुतारीप्रमाणें असलेलें वाद्य फुंकणारा )

———

एकूण संख्या ९

ह्या वादकांना प्रत्येकीं चार ह्याप्रमाणें एकंदर ३६ वृत्ति जमीन, तसेंच ब्राह्मण-भोजनासाठीं पांच ब्राह्मणास प्रत्येकी चार मिळून एकंदर वीस वृत्ति त्याचप्रमाणें नाम–संकीर्तन वगैरेसाठीं आठ निवर्तन जागा, याशिवाय देवाची रोजची पूजा, नैवेद्य व इतर धार्मिक कृत्यासाठी, तसेंच चैत्र पवित्र वगैरे पर्वांसाठीं एकंदर त्रिंशत म्हणजे ३०० वृत्त्या दिल्या आहेत.

ह्याशिवाय पूर्वी जैत्रपाल राजाच्या कारकिर्दींत दिनू नायक नांवाचा अधिकारी असतांना ह्याच देवालयासाठीं पंधरा निवर्त्तन ( भूमि ) व २५ वृत्त्या दिल्या असल्याचें लेखांत नमूद केलें आहे. त्या बहुधा नारण ह्या अधिकाऱ्यानें वेगवेगळ्या ब्राह्मणांना दान करून कायम केल्या असाव्या असें दिसतें. ह्यानंतर लेखांत शापाशीर्वादादि श्लोक येऊन लेख समाप्त होतो.

प्रस्तुत शिलालेखांतून यादव घराण्याच्या विषयीं फारशी माहिती मिळत नसली तरी येत येणारे अमरगांगेय व बल्लाळ ह्या राजांचे उल्लेख महत्त्वाचे आहेत. ह्या दोन्ही

